सं गी त

# नि रा धा र

[ अर्थात पोरकीं पोरं ]

[ स्वतंत्र सामाजिक नाटक ]

मुरारी गोपाळ शिवलकर

[नांवलौकिक, मायेचं मोल, पोटचा गोळा, अन्नदाता, समरांगण इत्यादि नाटकांचा कर्ता]

रा म कृ ष्ण बु क डे पो

गि र गां व, मुं ब ई ४

श्री. रा. रा. **वासुदेव काशिराम भोळे**

प्रिय अण्णा,

तुमचा हात धरूनच रंगभूमीवर पहिलं पाऊल टाकलं, चालायला–बोलायला शिकलों त्याबद्दल अल्पशी कृतज्ञता हें नाटक अर्पण करून व्यक्त करीत आहें.

—मुरारी

# निराधार

या नाटकाचा प्रथम प्रयोग "नटराज थिएटर्स" [ चिंचपोकळी ] नाट्य-संस्थेनें, दामोदर हॉल [ परळ ] येथें दिनांक २७-८-५४ रोजीं रात्रौ ८-३० वाजतां करून दाखविला. त्यावेळीं नाटकांत कामें करणाऱ्या कलावंतांचा परिचय—

| | | |
|---|---|---|
| काका | ... ... | आत्माराम राणे |
| बापू | ... ... | वामनराव चेंदवणकर |
| मोतीराम | ... ... | कृष्णराव मुळे |
| गोट्या | ... ... | मुरारी शिवलकर |
| यशवंत | ... ... | भाई सावंत |
| शंकर | ... ... | यशवंत शिवणकर |
| शांता | ... ... | निर्मला कोल्हापुरे |
| उमा | ... ... | शुभांगी शिवलकर |

* * * * * *

| | | |
|---|---|---|
| दिग्दर्शक | ... ... | भाई सावंत |
| संगीत दिग्दर्शक | ... ... | कृष्णराव मुळे |
| पेटीवादन | ... ... | नारायण चिंबुलकर |
| तबलजी | ... ... | पांडुरंग साळुंके |
| | ... ... | सातम |
| फिडल् | ... ... | रामभाऊ शिवडीकर |
| क्लॅरिओनेट् | ... ... | अनंत परब |
| फ्ल्यूट | ... ... | जनार्दन भोवर |
| मेकअप् | ... ... | प्रो. भाई आचरेकर [ शोभा मेकअप् सर्व्हिस ] |
| छायाचित्रें | ... ... | राजाराम मयेकर [गजानन स्टुडिओ] दादर |
| निर्माता | ... ... | बाबासाहेब परब |
| व्यवस्थापक | ... ... | रमाकांत जयराम मयेकर |

# १

[ प्रस्तुत नाटकांतील कथानकाची सुरुवात, शहरवजा गांवांतील आहे. काकांच्या घराचा ओटा. जवळ जवळ बसण्या–उठण्याचीच ती जागा. दर्शनीं बाहेरून येण्याचा दरवाजा आहे. उजव्या बाजूच्या कोपऱ्यांत दादर असून; बाजूलाच खोलींत जाण्याचा दरवाजा आहे; तसंच डाव्या बाजूला दुसऱ्या खोलींत जाण्याचा दरवाजा. सजावटींत श्रीमंतीची झांक मारल्या-शिवाय रहात नाहीं. टेबल–खुर्च्यांची मांडणी आधुनिक पद्धतीची. भिंतीवर घरांत वावरणाऱ्या व कांहीं मृत व्यक्तींच्या तसबिरी आणि कॅलेंडर्स लटकत आहेत. पडदा वर जातो; यशवंत विचारमग्न बसला आहे; इतक्यांत आंतून ‘ काका ’ बाहेर जाण्याच्या तयारीनं येतात. ]

**काका** : यशवंत—

**यशवंत** : काय काका ?

**काका** : काय ठरतोय तुझा विचार ?

**यशवंत** : तोच विचार करतोंय् मी !

**काका** : अरे, त्यांत विचार कसला करायचा ? एकदां चांगल्या मार्गाला लागलास म्हणजे त्यांतच मला आनंद. आतां तूं कांहीं लहान नाहींस. तुला कळायला पाहिजे.

**यशवंत** : पण माझी कुठं तक्रार आहे ? आजच मोतीरामला पत्र लिहिणार आहें मी.

**काका :** अं ? मोतीरामाला पत्र पाठवणार आहेस ? ठीक ! त्याला पत्र पाठवून तो काय जबाब देतो तें बघ; नाहींतर माझे एक–दोन स्नेही मुंबईला आहेत, त्यांना मी पत्र पाठवून नोकरी बघायला सांगतों तुला ! हं ?—

**यशवंत :** बरं !

**काका :** एकदां नोकरीचं जमलं म्हणजे लग्नाचाही विचार करतां येईल तुझ्या. या वयांत एकदां नोकरीचा जम बसला म्हणजे पुढच्या दृष्टीनं तें ठीक असतं–नाहीं का ? शिवाय लोकांचाही माझ्यावर बोल नको. म्हणतील भावाचा एकच्या–एक पोरका पोरगा, पण चुलत्यानं कांहीं त्याला मार्गाला लावलं नाहीं !

**यशवंत :** पण मी म्हटलंय का कधीं तसं ?

**काका :** तूं नाहीं म्हणत तसं–पण लोकांचं तोंड कोण धरणार ? तुझ्या बापाच्या पाठीमागं जेवढं करतां येणं शक्य होतं, तेवढं तुम्हां दोन भावंडांसाठीं मी केलं. आतां अधिक भार वहाण्याची माझी ताकद नाहीं.

**यशवंत :** मला जाणीव आहे ती !

**काका :** नुसती जाणीव असून काय उपयोग ? त्या दिशेनं पावलं टाकायला नकोत का ? अरे, मी दहा वर्षांचा असतांना, दुसऱ्यांची गुरं राखायला राहिलों होतों. तूं आतां येवढा वाढलास, शिकलासवरलास तरी कामधंद्याचं नांव घेत नाहींस, शोभतं कां हें ? ती पोर शांती, सतरा अठरा वर्षांची झाली तरी सारखी हुदडत असते. कांहीं रीत–भात आहे तिला ? मी म्हणून हें सारं सहन करतों. दुसऱ्यांकडे हें चाललं असतं का ? आतां मीच सारखं–सारखं बोलूं लागलों तर लोक उद्यां म्हणतील, भावाचीं दोन पोरं, तीहीं याला जड झालींयत.

**यशवंत :** असं बोलायला लोकांचं काय खर्च होतंय् ? आपली जबाबदारी आपल्याला ठाऊक आहे.

**काका :** कसं योग्य बोललास हें ? लोकांना वाटतं आम्हीं चार पैसे बाळगून आहोंत; पण या बड्या घरचा वासा पोकळ झालाय् हें त्यांना काय ठाऊक ? न म्हणायला तुझ्या बापाचे थोडेफार पैसे शिल्लक होते. पण ते किती दिवस पुरणार होते ?–त्यांचा केव्हांच निकाल लागला !

**यशवंत :** पण मी त्याबद्दल एका शब्दानं तरी विचारलंय् का कधीं ?

**काका** : अरे, तो तुझा शहाणपणा झाला ! पण मी आहे व्यवहारी माणूस. या पैशा–आडकाच्या व्यवहारांत अगदीं रोखठोक कारभार ! कुणाची भीडभाड नाहीं; आणि म्हणूनच हे दिवस पाहिले मी.

**यशवंत** : तुमचे उपकार—

**काका** : उपकार कसले ? चुलता या नात्यानं माझं कर्तव्य नाहीं का तें ? पण गोष्ट अशी आहे, सगळे दिवस कांहीं सारखे नसतात. मी जरा बाहेर जाऊन येतों. आणि हो, आजच्या आज मोतीरामला पत्र पाठव तूं. त्याच्याकडून जमण्यासारखं नसलं तर मी व्यवस्था करायला लावतों माझ्या मित्रांना पत्र पाठवून–हें बघ, वाईट वाटून घेऊं नकोस. कर्तव्य माणसाला नेहमीं कठोर व्हायला शिकवतं. उमा आणि शंकर आलीं नाहींत ना अजून ?

**यशवंत** : येतील एवढ्यांत.

**काका** : मग शांताला जेवणाचं पहायला सांग आणि तूं पत्र लिहायला विसरूं नकोस !

[ काका बाहेर जातात. यशवंत लिहिण्याच्या मेजापाशीं असलेल्या खुर्चीवर बसून पत्र लिहूं लागतो. पत्र लिहितांलिहितां, तो अधुनमधून हंसतो. आंतून शांता येते. वय १७।१८. यशवंताला हंसतांना पाहून तिला आश्चर्य वाटतं. ती त्याच्या जवळ जाते. ]

**शांता** : दादा—

**यशवंत** : काय ग ?

**शांता** : कुणाचं पत्र ?

**यशवंत** : ( रागवल्यासारखं करून ) कुणाचं का असेना–तुला काय करायचंय ?

**शांता** : लागलास उलटसुलट बोलायला ? कधीं सरळ उत्तर देणार नाहींस विचारल्या प्रश्नाचं !

**यशवंत** : आतां काय वांकडं बोललों मी ? माझ्यासारखा सरळ माणूस—

**शांता** : पृथ्वीच्या पाठीवर तूं एकच—

**यशवंत** : शाबास ! माझी बहीण शोभतेस.

**शांता** : दादा, कुणाचं रे पत्र ?

**यशवंत :** दुसऱ्याच्या खासगी भानगडीची उघडपणें चौकशी करतेस ? तुला अक्कल तरी येणार केव्हां ?

**शांता :** तुझ्या अकलेचं दिवाळं निघाल्यावर !

**यशवंत :** गेलीस–गेलीस शांते, पोरी कामांतून गेलीस–भावाच्या कीर्तीला काळं फांसलंस–आपल्या घराण्याची परंपरा—

**शांता :** आपल्या चांगुलपणानं अबादी–आबाद राखलीस !

**यशवंत :** ( बोलण्याच्या ओघांत ) हो–हो ! ( चूक लक्षांत येऊन ) छे–छे ! तूं काय परंपरा राखणार ?–ज्यांच्या घराण्यांत तूं पडणार त्यांच्याकडून या तुझ्या भावाला शालजोडींतला आहेर स्वीकारावा लागणार !

**शांता :** तूं माझं लग्न करून तर बघ. यशवंतदादाच्या कीर्तीला साजेल अशीच वागेन मी.

**यशवंत :** शांते, दिवटे, वडील माणसांसमोर लग्नाची चर्चा करतेस ?

**शांता :** तुझ्या प्रश्नाचं उत्तर दिलं.

**यशवंत :** ठीक ! नाहींतर—

**शांता :** काय करणार होतास ?

**यशवंत :** मोतीरामच्या पत्रांत ताजाकलम लिहिणार होतों, 'माझ्या शांता-ताईला लवकरच पदरांत घे म्हणून.'

**शांता :** मला कांहीं लग्नाची घाई नाहीं. तूंच लवकर उरकून घे आपलं आणि मला वहिनी आण.

**यशवंत :** आधीं ही घोरपड त्या मोतीरामच्या गळयांत बांधून मला लागलेली घोर चिंता नाहींशी करणार आणि मग माझ्या लग्नाचा बेंडबाजा वाजवणार !

**शांता :** पहिल्यांदा मला वहिनी हवी.

**यशवंत :** आधीं मला मेहुणा हवा.

**शांता :** मी लग्नाला उभीच रहाणार नाहीं मुळीं.

**यशवंत :** तंगड्या तोडून टाकीन !

**शांता :** छान ! उभं राहण्याचा प्रश्नच मिटला !

**यशवंत** : नाहीं, हा प्रश्न असा मिटणार नाहीं. युनोपुढं ही केस चालवीन. निकाल निश्चित माझ्या बाजूनं लागणार, आणि शेवटीं तुझ्या टाळक्यावर मंगलक्षता उधळून मोकळा होणार. थांब आलों हं मी !

**शांता** : कुठं चाललास रे ?

**यशवंत** : बोंचक्यांत बांधून ठेवलेली पगडी अन् उपरणं आणायला.

**शांता** : पगडी—उपरणं कशाला ?

**यशवंत** : माझ्या डोक्यावर पगडी आणि खांद्यावर उपरणं असल्याशिवाय तुझ्या कपाळाला बाशिंग बाधलं जाणार नाहीं. ( हंसत खोलींत जातो. )

**शांता** : जा—अगदीं धुमधडाक्यानं माझ्या लग्नाच्या तयारीला लाग.

( आनंदानं हंसते. )

[ राग : खंबावति; ताल : धुमाळी ]

लग्नघटिका मंगल बाई
आनंदाच्या उर्मी उसळती हृदयीं ॥ धृ० ॥
अधीर मन हें थयथय नाचत
पति सदनीं मी हांसत हांसत
संसाराच्या हिंदोळ्यावर
मंजुळ गाईन गाणीं ॥ १ ॥

[ गाणं संपतं इतक्यांत हात झटकीत यशवंत येतो. ]

काय रे, पगडी उपरणं कुठंय् ?

**यशवंत** : बोचक्याची गांठ एवढी घट्ट बसली आहे कीं, तुझी लग्नगांठ बांधल्याशिवाय ती कांहीं सुटणार नाहीं.

**शांता** : ( हांसते—किंचित थांबून ) ए दादा, जरा तें पत्र वाचावला देतोस ?

**यशवंत** : तुला काय करायचं आहे तें पत्र वाचून ? ती माझी खासगी बाब आहे.

**शांता** : खाजगी बाब ना ? मग नक्कीच तें एखादं प्रेमपत्र असलं पाहिजे.

**यशवंत** : माझ्यावर असला आरोप करतेस ? असल्या फंदांत मी कधींच पडणार नाहीं.

**शांता** : पण पत्र वाचल्याशिवाय हें पटणार कसं ? मला वाचलंच पाहिजे पत्र.–नाहीं तर—

**यशवंत** : नाहीं तर काय ?

**शांता** : सगळ्यांना ही तुझी भानगड सांगेन.

[ इतक्यांत गोट्या येतो. शांतेचे शब्द कानांवर पडतांच तो दारांतच थबकून उभा रहातो. गोट्याचं वय सुमारें ३०–३१, हाल–चाल थिल्लर. ]

**यशवंत** : कोण गोट्या ? ये ना बैस.

**गोट्या** : ( बसतो. ) हें पहा यशवंता, यापुढं मला गोट्या म्हणायचं नाहीं.

**शांता** : मग काय म्हणायचं ?

**गोट्या** : मनमोहन.

**यशवंत** : मनमोहन ? ही नांवाची अदलाबदल कां केलीस रे ?

**गोट्या** : वाडवडिलांच्या मूर्खपणाचा त्रास कमी करण्यासाठीं.

**यशवंत** : म्हणजे ?

**गोट्या** : अरे, या वडीलमाणसांनीं, माझ्या बारशादिवशीं मूर्खपणा केला आणि माझं नांव गोट्या ठेवलं, तेंच सारखं नडतंय मला.

**यशवंत** : कां ?–काय झालं बुवा ? आज कांहीं विशेष घडलं वाटतं ?

**गोट्या** : दररोज तेंच चाललंय्. नकट्या नाकाच्या नाठाळ पोरीसुद्धां माझं गोट्या हें नांव ऐकल्याबरोबर कपाळाला आंठ्या घालून नाकं मुरडतात. एवढंच कशाला ?–ज्यांना धड लंगोटी नेसतां येत नाहीं अशी आमच्या वाडींतलीं पोरंही माझी टर उडवतात.

**शांता** : मनमोहन नांव मात्र छान आहे.

**गोट्या** : तुम्हांला पसंत पडलं ना ? मग माझ्या नांवाचं सार्थक झालं. यशवंता, माझं हें नांव कसं काय आहे ?

**यशवंत** : मनमोहना, मित्रा गोट्या, या चांगल्या नामोच्चाराची विटंबना करण्याची दुर्बुद्धी तुला कां सुचली रे ? अरे, या नांवाउलट तुझा सारा प्रकार.

**गोट्या** : तुझ्या असल्या टोमण्यांनीं माझी उमेद खचणार नाहीं. मनमोहन या नांवानंच मी कुणाला तरी मोहून टाकीन ! अरे, परवां अशी एक गंमत झाली. सांगूं ?—

**यशवंत** : सांग–सांग !

**शांता** : आमचा दादा म्हणजे असा आहे, दुसऱ्याच्या दुःखांतच त्याला आनंद !

**गोट्या** : हा आहेच तसा. याच्या लहानपणापासून ओळखतोच् मी याला. सगळ्या बाबतींत वात्रटपणा.

**यशवंत** : तुझ्या सभ्यपणाचा पाढा वाचूं का ?

**गोट्या** : शहाणपणा आवर जरा ! अं ऽ हं ! तेव्हां गंमत अशी–गंमत म्हणजे काय ?–गंमत नव्हेंच ती, हकिकत आहे दुःखदायकच. परवां काय झालं ?–मी वडाच्या पारावर बसलों होतों. इतक्यांत दोन पोरी माझ्या समोरून येत होत्या. मी जरा ठाकठीक बसलों. त्या लाजत मुरडत माझ्या जवळ येऊन उभ्या राहिल्या.

**यशवंत** : या मनमोहनाची त्यांच्यावर मोहिनी पडली असेल !

**गोट्या** : अर्थात्च ! तसा रुपानं मी असामान्य आहें.

**यशवंत** : तर–तर ! तुझ्यासारखा कोहिनूर हिरा एखादाच सांपडायचा.

**शांता** : अहो पण; परवां त्या पोरी तुमच्या समोर येऊन उभ्या राहिल्या त्या अजून तशाच उभ्या आहेत त्यांचं काय ?

**गोट्या** : हो–हो, त्या तशाच उभ्या आहेत; आणि हा माझा खोळंबा करतोय ! हं–तेव्हां त्या माझ्याशीं बोलणार इतक्यांत त्या पांड्या पेटकराच्या पोटांत पेटका आला आणि "काय रे अे गोट्या–कसल्या उठाठेवी चालवल्या आहेस" असं ओरडला. झालं त्या पोरींच्या चार शब्दांना देखील मुकावं लागलं मला अखेर.

**यशवंत** : ( हंसून ) तें कसं ?

**गोट्या** : अहो, त्या मूर्खानं 'गोट्या' म्हटल्याबरोबर त्या पोरींनीं सशासारखे कान टवकारून माझ्याकडं पाहिलं; आणि अय्या म्हणून निघून गेल्या त्या ! गोट्या नांवामुळं केवढा हा तोटा ? ( शांता–यशवंत हांसतात. )

**यशवंत** : तेव्हां हा नफातोटा तूं मनमोहन या नांवानं भरून काढणार ?

**गोट्या** : मग बोलणं आहे कीं काय ? क्रांती करून टाकणार या नावानं. पंचवीस वर्षें हा तोटा सहन केला. या पुढं ती सगळी कसर भरून काढणार ! केव्हां केव्हां असं वाटतं; हीं सारीं माणसं एकत्र गोळा करून हिमालयावर न्यावीं आणि बर्फाच्या ढिगाऱ्याखालीं दडपून द्यावीं.

**यशवंत** : वडील माणसांबद्दल भलताच आदर दिसतो आहे तुला.

**गोट्या** : माझ्यावर झालेल्या अन्यायाची आठवण झाली म्हणजे अंगाचा कसा तीळपापड होतो माझ्या.

**शांता** : चहा आणूं का ?—

**गोट्या** : कशाला चहा ? मडक्यांतलं तांब्याभर गार पाणी आणा.

( शांता जायला निघते. )

**यशवंत** : घसा कोरडा पडला वाटतं ? थांब शांता–येतांना एक भरलेली कळशीही घेऊन ये.

**शांता** : कशाला ?

**यशवंत** : याच्या भडकलेल्या डोक्यावर ओतायला. ( शांता हंसत जाते. )

**गोट्या** : विचार करून करून अक्कलेचा चुराडा व्हायची वेळ आली आहे.

[ शांता पाण्याचं ग्लास घेऊन येते. गोट्या पाणी पितो. शांता ग्लास घेऊन घरांत जाते. ]

**यशवंत** : डोकं थंड झालं ना ?

**गोट्या** : मी जेवढ्या लवकर गरम होतों तेवढ्याच लवकर थंड होतों. यशवंता, आज घरांतलीं माणसं गेलीं कुठं ?

**यशवंत** : काका बाहेर गेले आहेत. शंकरदादा आणि वहिनी, कुणी तरी आजारी आहे त्याला बघायला गेलीं आहेत. काय रे गोट्या, आज इकडं कसा काय झुकलास ?

**गोट्या** : सहज !

**यशवंत** : सहज ? छे–छे ! हा मनमोहन तसा सहजासहजीं दिसायचा नाहीं.

**गोट्या** : सध्यां मी दौऱ्यावर आहें.

**यशवंत** : कसल्या ?—

**गोट्या** : माझ्या लग्नाबाबत. सगळं कांहीं जमतं,—मुहूर्त ठरतो आणि पत्रिका छापायच्या वेळीं लग्न फिसकटतं.

**यशवंत** : याला काय कारण असावं असं तुला वाटतं ?

**गोट्या :** कांहींच थांगपत्ता लागत नाहीं. ठरलेलीं लग्नं जसजशीं फिसकटत चाललीं आहेत, तसतसा लग्न करण्याचा माझा निश्चय अधिक उसळ्या मारूं लागला आहे.

**यशवंत :** लग्न ठरलंच नाहीं तर तूं काय करणार ?

**गोट्या :** माझं लग्न जमणारच नाहीं असं कांहीं माझ्यांत व्यंग आहे का ?

**यशवंत :** पण समज—

**गोट्या :** असा भलताच समज करून घ्यायला मी तयार नाहीं. तोंडाचं बोळकं झालेल्या म्हाताऱ्यांचीं लग्नं होतात, मग मी तर काय ?–तरणाबांड ! आज ना उद्यां माझं लग्न जमणारच !

**यशवंत :** हे बघ गोट्या, थोडे दिवस शांत रहा. सारं कांहीं ठीक होईल.

**गोट्या :** बाबारे, वरकरणी शांतच असतों, पण आंतून सारखा धगधगत असतो. रस्त्यांतून जातांना प्रत्येक कुमारीकेकडं आशाळभूतपणानं मी पहातों. पण त्यापैकीं एकीलाही या गोट्याची दया येत नाहीं. येतात त्याला चारचार मुली सांगून येतात, पण माझ्या बाबतींत मात्र ब्रह्मदेवाचा कोलदांडा, असले विचित्र त्रांगडं झालं आहे. यशवंत, ए–माझा दोस्त नारे तूं ? मग कर रे कुठं तरी खटपट !

**यशवंत :** असं ? ठीक. तुझ्या लग्नाचं कंत्राट मी घेतों. यापुढं लागतोंच मी त्या प्रयत्नाला.

**गोट्या :** असं मनावरचं सांगूं नको. नेटानं प्रयत्न कर. देवाला नवस बोलण्यापेक्षां मी तुलाच आश्वासन देतों, माझ्या मुलाच्या बारशाच्या दिवशीं सव्वामण पेढे तुला देईन.

**यशवंत :** वचनांत बदल तर होणार नाहीं ना ?

**गोट्या :** माझ्या कर्तबगारीवर विश्वास ठेव ! आणि बदल झालाच तर माझ्या बेचाळीस पिढ्या नरकांत जातील ! झालं ना तुझं समाधान ?

**यशवंत :** कांहीं घाबरूं नकोस. उद्यांपासून तुझ्या लग्नाच्या तयारीला लागतों.

**गोट्या :** शाबास ! मृग नक्षत्र पडण्या अगोदर माझ्या टाळक्यावर अक्षता पडल्या पाहिजेत. जातों मी !

[ गोट्या जायला निघतो, बाहेरून बापू येतात. वय ५० च्या आसपास. धीरगंभीर वृत्ती. ]

**यशवंत** : या बापू.

**बापू** : काय रे गोट्या, कां निघालास कां ?

**गोट्या** : बापू, थांबायला वेळ नाहीं. सारखी धांवपळ सुरू आहे.

**बापू** : कशासाठीं ?—

**गोट्या** : माझ्या लग्नासाठीं ! तुमच्यासारखीं वडील माणसं लक्ष देत नाहींत; तेव्हां आमच्या कार्यासाठीं आम्हांलाच कंबर कसावी लागली आहे. ( बापू हंसतात ) यशवंत, विसरूं नकोस रे. जातों मी. ( घाईघाईनं निघून जातो. )

**बापू** : ( हंसत ) पोरगा अगदीं चक्रम डोक्याचा आहे. कुठं काय बोलेल याचा नियम नाहीं.

**यशवंत** : आहे करमणुकीचं साधन.

**बापू** : अरे, परवां रामनवमीच्या उत्सवांत भेटला मला. माझ्याजवळ येऊन म्हणतो काय ?–बापू, माझ्या लग्नाचं जमवा हो कुठं तरी. काय म्हणावं या पोराला ?

**यशवंत** : मलाहि तेंच सांगायला आला होता. ( दोघंही हंसतात. )

**बापू** : यशवंता, मालक मंडळी घरांत नाहीं वाटतं ?—

**यशवंत** : हो, बाहेर गेले आहेत. शांता घरांत आहे. शांता ऽ, ए शांता ऽ ऽ ! ( आंतून शांता : काय रे दादा ! ) बाहेर ये जरा. बापू आले आहेत.

[ शांता येऊन दारांत उभी राहते. ]

**बापू** : कसं काय ?–ठीक आहे ना शांता ?—

**शांता** : हो.

**यशवंत** : बरेच दिवस इकडं फिरलां नाहीं बापू ?

**बापू** : अरे हा संसाराचा व्याप आहे ना पाठीशीं ! बरं, मला एक यायला सवड मिळत नाहीं; पण तूं काय करतोस ? तुला यायला जमत नाहीं ?

**यशवंत** : कालच शांतानं तुमच्याकडं जायची आठवण केली होती. आज मात्र येणारच होतों निश्चित.

**बापू :** म्हटलं या पोरांची कांहींच हकीगत समजत नाहीं, तेव्हां आपणच जाऊन पहावं.

**शांता :** चहा घेणार ना?—

**बापू :** मला चहा नको : जेवणाची वेळ झाली आहे, घरीं वाट पहात रहातील.

**यशवंत :** थोडासा चहा घ्या!

**बापू :** अगदीं नको. तुम्हीं आनंदांत आहांत एवढं पाहिलं, समाधान वाटलं. अरे, गोपाळ जिवंत असतां, तर तुम्हांला कशाला मन मारून रहावं लागलं असतं? आई तुमच्या लहाणपणींच वारली, तुम्ही कर्तबगार झाल्याचं पाहण्या-अगोदर बाप गेला. पोरक्या पोरांची दुःखं मला माहीत आहेत.

**यशवंत :** बापू—

**बापू :** वाईट वाटून घेऊं नका पोरांनों. हे दिवस कांहीं कायमचे रहाणार नाहींत. उद्यां तूं आपल्या पायावर उभा राहिलास, मग कांहीं जाणवणार नाहीं.

**यशवंत :** आजही आम्हीं अगदीं आनंदांत आहोंत बापू!

**बापू :** या म्हाताऱ्याची फसवणूक करतोस काय? मी जरी वरचेवर इथं येत नसलों तरी सगळ्या गोष्टीं कानावर येतात माझ्या. हौसे-मौजेचे तुमचे हे दिवस पण–( शांताचं हृदय भरून येतं. तिला तिचा हुंदका आवरत नाहीं. ती 'आई' असं अस्पष्ट बोलून रडूं लागते.) (बापू जवळ जाऊन–) रडतेस पोरी, रडून आपलं दुःख कमी होत नसतं. दुःख सहन करून आनंदानं जगायचं असतं माणसानं! तुमच्या बापाच्या मायेची उणीव मी भरून काढीन! समजलं? पूस पाहूं डोळे. जा तूं आपलं काम कर जा! (शांता आंत जाते.)

**यशवंत :** बापू, मोतीरामचं पत्र आलं होतं का अलिकडे?

**बापू :** दोन दिवसांपूर्वीच पत्र आलं. एक महिन्याची रजा घेतली आहे त्यानं. काल साडेपांचच्या गाडीनं निघणार होता इकडं यायला बहुतकरून घरीं आलाही असेल तो या वेळीं.

**यशवंत :** होय का? अगदीं थोड्यावेळांपूर्वीच पत्र लिहिलं होतं मी त्याला. पोस्टांत जाणार होतों आतां.

**बापू :** काय लिहिलं होतंस पत्रांत?

**यशवंत :** विशेष कांहीं नाहीं. माझ्या नोकरीसंबंधीं लिहिलं होतं.

**बापू :** या पोरीला यांच्या हवालीं करून तूं मुंबईला जाणार ?

**यशवंत :** म्हणूनच जीव ओढतो माझा. नोकरीचं जमल्यावर तिलाही घेऊन जाईन.

**बापू :** तें योग्य दिसणार नाहीं. उगाच घरांत भाडंण–तंटे नकोत. शिवाय माझा विचार यंदा—

**यशवंत :** बोला ना–थांबलांत का ?

**बापू :** शांतेला सून करून घेण्याचा आहे. तुझे वडील असतांना, ते नेहमीं म्हणायचे 'बापू, तुमच्या मोतीरामलाच मी माझी शांता देणार !' गोपाळ गेला तरी त्याचे ते शब्द अजून माझ्या कानांत घुमताहेत.

**यशवंत :** मी कांहीं तुमच्या विचाराबाहेर नाहीं.

**बापू :** आज मोतीराम आल्यावर त्याच्याजवळ मी बोलणार आहें या बाबतींत. त्याची पसंती असली म्हणजे मग तुझ्या चुलत्याजवळ मी हा विषय काढणार आहे.

**यशवंत :** काकांबद्दल मी काय सांगूं पण–मोतीराम—

**बापू :** या गोष्टीला नकार देणार नाहीं, असंच ना ? अरे, मला सारं ठाऊक आहे. तुमचीं पत्रं जातात नाहीं का एकमेकांना ?

**यशवंत :** अगदीं असंच कांहीं नव्हे—

**बापू :** असंच आहे सारं ! या साऱ्या गोष्टी माझ्या कानांवर आल्या आहेत.

**यशवंत :** तुमच्याजवळ बोलला वाटतं मोतीराम ?

**बापू :** माझ्याजवळ कसा बोलेल तो ? गेल्यावर्षीं रजेवर आला होता ना ?–तेव्हां आपल्या आईजवळ विषय काढला होता त्यानं. बाबारे, आम्हीं म्हातारीं माणसं डोळे असून आंधळेपणा दाखवतों या बाबतींत. तो रजेवर घरीं आला होता पण सकाळीं उठल्याबरोबर इकडं हजेरी असायची त्याची.

**यशवंत :** मग तुमची या गोष्टीला संमती आहे तर ?

**बापू :** माझ्यापेक्षां मोतीरामच्या आईनंच तें ठरवलं आहे. शांता सहा–सात वर्षांची असतांना गोपाळ वारला ना ? तेव्हांच तिनं ठरवून ठेवलंय कीं शांतेला सून म्हणून आपल्या घरीं आणायचीच.

**यशवंत :** शांतेचं एकदां लग्न झालं म्हणजे मला दाही दिशा मोकळ्या झाल्या. तिच्यामुळच तर मला हें घर सोडून कुठं जाता येत नाहीं.

**बापू :** कांहीं काळजी करूं नकोस तूं. सारं कांहीं तुझ्या मनाप्रमाणेंच होईल. बरं, मी आतां जातों !

**यशवंत :** नाहींतर जेवूनच चला ना.

**बापू :** भलताच आग्रह करूं नकोस. सकाळीं घराबाहेर पडलोंय् तो अजून फिरतोंय् ! शिवाय मी घरीं गेल्याशिवाय ती कांहीं जेवायची नाहीं. शांतेला हांक मार पाहूं !

**यशवंत :** शांता–ए शांता ( शांता येते. )

**बापू :** जातो हं मी.

**शांता :** जेवतां का थोडं ?

**बापू :** एवढ्यांतच माझी काळजी करूं नकोस. तशीच वेळ आली म्हणजे घे माझी काळजी.

[ बापू हंसत जातात. दरवाजापर्यंत यशवंत पोंचवायला जातो. शांता बापूंच्या बोलण्याच्या विचारांतच असतांना यशवंत परत येतो. ]

**यशवंत :** ( रागाचा आविर्भाव आणून ) शांते, इकडे ये बघूं.

**शांता :** काय ?

**यशवंत :** मी एवढा मोठा भाऊ घरांत असतांना मर्यादा सोडून बोलायला तुला कुणी सांगितलं होतं ?

**शांता :** काय चुकलं माझं ?

**यशवंत :** ( वेडावून ) काय चुकलं माझं ?, 'बापू, जेवून चला' असं बोलायला तुला कुणीं सांगितलं होतं ?

**शांता :** घरीं आलेल्या पाहुण्यांचा आदरसत्कार करणं, हें प्रत्येक माणसाचं कर्तव्य असतं.

**यशवंत :** या कर्तव्यपालनाच्या पाठीमागं भावी सासऱ्याबद्दलची कळकळ दडलेली आहे, खरं कीं नाहीं ?

**शांता :** बघ हं दादा !

**यशवंत :** बघीतलं म्हणूनच तर बोलतो आहें ना ?

**शांता :** बरं–बरं ! उद्यां तुझं लग्न झालं म्हणजे याचं उट्ट काढीन मी—

**यशवंत :** तुझ्यासारखी खाष्ट नणंद या घरांत असेपर्यंत इथं बायको आणतोय् कोण ? आधी तुला त्या मोत्याच्या पदरांत घालणार.

**शांता :** असं काय !?

[ धांवत जाऊन मेजावरचं पुस्तक यशवंताच्या अंगावर फेंकते—तें बाहेरून येणाऱ्या मोतीरामच्या छातीवर आदळतें. वय:२५–२६. देखणा–हंसतमुख. ]

**मोतीराम :** छान ! आल्याबरोबर दारांतूनच परत जाण्याची सूचना कीं काय ?

**शांता :** ( अपराधी जाणीवेनं ) अगबाई, ( लाजून आंत पळते. )

**यशवंत :** ( आनंदानं ) मोतीराम आलास तूं ?

**मोतीराम :** सकाळीं साडेनऊ वाजतांच आलों.

**यशवंत :** प्रकृती वगैरे ठीक आहे ना ?

**मोतीराम :** ठीक आहे. पण काय रे, उमावहिनी कुठं आहेत ?

**यशवंत :** शंकरदादा आणि ती गेली आहेत कुणा आजारी माणसाला बघायला. परतायला पाहिजे इतक्यांत–हो पण बापू भेटले तुला ?

**मोतीराम :** नाहीं. ते इकडं आल्याचं समजलं म्हणूनच—

**यशवंत :** तूं इथं आलास ?

**मोतीराम :** अर्थात्च !

**यशवंत :** कां ? घरीं भेटणार नव्हते ?

**मोतीराम :** अरे, पण—

**यशवंत :** बस–बस–बस ! आतां पुढं बोलूंच नकोस !

**मोतीराम :** म्हणजे काय, म्हणायचंय् तरी काय तुला ?

**यशवंत :** मला काय म्हणायचंय् तें तुला चांगलं समजलंय, आणखीं मी कशाला सांगूं ?

**मोतीराम :** हें तुझं आडपडद्याचं बोलणं—

**यशवंत :** सारं कांहीं समजलंय् तुला. बरं तें जाऊं दे. तुझा प्रवास कसा काय झाला ?

**मोतीराम** : उत्तम.

**यशवंत** : अरे, आज तुला पत्र लिहिलं होतं मी.

**मोतीराम** : ( हंसून ) पोचलं मला तें.

**यशवंत** : मी पाठविल्याशिवाय ?—

**मोतीराम** : मग ? तेव्हांच तर विमानाच्या वेगानं गांवीं येऊन पोंहचलों. काय लिहिलं होतंस रे पत्रांत ?

**यशवंत** : आतां आलायस; सांगेन सावकाश. शांता ऽ ! ए शांते ऽ !

**शांता** : ( मधल्या दारांत येऊन लाजून उभी रहाते. ) काय दादा ?—

**यशवंत** : आठ–दहा कप पाणी ठेव चहाला !

**शांता** : ठेवलंय ?

**यशवंत** : अं ? ठेवलंस पाणी ?

**शांता** : हो.

**यशवंत** : छान !—

**शांता** : दादा, जरा आंत ये पाहूं !

**यशवंत** : कशाला ?—

**शांता** : पण तूं आंत ये ना–मग सांगते.

**यशवंत** : अग, याला कशाला लाजतेस ? इथंच सांग काय तें ?

**शांता** : घरांत ये ना !

**यशवंत** : पुन्हां तेंच. काय सांगायचंय तें इथंच सांग. मी आंत येणार नाहीं.

**शांता** : कपाटाची किल्ली राहिली वहिनीशीं, दूध बाहेरून आणायला हवंय.

**यशवंत** : हात्तीच्या ! एवढंच ना ? ग्लास आण इकडं, आतां दूध घेऊन येतों.

( शांता आंत जाते. )

**मोतीराम** : अरे, जेवून आलोय–चहाची जरूर काय आहे ?

**यशवंत** : तें तुझ्यापेक्षां मला जास्त कळतंय. ( शांता ग्लास घेऊन येते. ) आतां गणूकाकांकडून दूध घेऊन येतों. बस रे मोती. शांते, तूं आंत चल.

**मोतीराम** : जा रे तूं. ( यशवंत हंसत–हंसत जातो. ) शांता !

**शांता :** ( लाजेनं ) काय ?

**मोतीराम :** घरांतलं वातावरण कसं काय आहे ?

**शांता :** ठीक चाललंय् !

**मोतीराम :** आमच्या बापूंनीं काकांजवळ कांहीं विषय काढला होता का कधीं ?

**शांता :** कशाबद्दल ?—

**मोतीराम :** मीच सांगायला हवं का तें ?

**शांता :** ( गडबडून ) मला कांहीं ठाऊक नाहीं.

**मोतीराम :** माझ्याजवळ खोटं बोलतेस ?

**शांता :** मुळींच नाहीं. बऱ्याच दिवसांनीं बापू आज आले होते.

**मोतीराम :** काका भेटले त्यांना ?

**शांता :** नाहीं. फक्त दादाच भेटला होता.

**मोतीराम :** त्यांचा कांहीं विषय चालला होता का ?

**शांता :** काकांना आपण लवकरच भेटणार आहोंत असं कांहींतरी बापू म्हणत होते.

**मोतीराम :** तुला कसं कळलं हें ?

**शांता :** दाराआडून ऐकलं मी तें.

**मोतीराम :** दुसऱ्यांचीं बोलणीं चोरून ऐकणं चांगलं नव्हे.

**शांता :** ( भीतिनं ) म्हणजे ?

**मोतीराम :** आतां जवळ येऊन सांगायला हवं का ?

**शांता :** नको—नको, ( सावकाशपणं त्याच्याकडं पाहून एकदम लाजून ) मी तुमच्या चहाची तयारी करतें. ( एकदम आंत निघून जाते. )

**मोतीराम :** ( तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात ) शांताच्या मर्यादशील हंसण्याबोलण्यांतच मला हवं असलेल्या प्रश्नाचं उत्तर मिळालं !

[ राग : पटदीप; ताल : त्रिताल. ]

तुज पाहतां मम लोचनीं

मोहुनी जाई सखे—साजणी

लज्जीत लाली गाली रंगली
भाग्यदेवता जणूं भासली
उभय कुळानां ये भूषवाया ॥ १ ॥

[ गाणं संपतं. यशवंत रिकामं ग्लास झेलींत येतो. ]

**मोतीराम** : काय रे, दूध मिळालं नाहीं वाटतं ?

**यशवंत** : त्यांचं दुधाचं गाडगंच बोक्यानं फोडून टाकलं ! ( शांता येते. )

**शांता** : आणलंस दूध ?

**यशवंत** : दूध संपलं. कोरा चहा दे त्याला.

**शांता** : कोरा ?—

**मोतीराम** : चालेल मला. ( शांता आंत जाते. ) उमा वहिनीला भेटायला पुन्हां यावं लागणार असं वाटतं.

**यशवंत** : तें झालंच ! पुन्हां यावं लागणार यांत प्रश्नच नाहीं. पण आतां आल्यासारखा आणखी थोडा वेळ वाट पहा !

**मोतीराम** : अरे बाबा, आल्यापासून पुऱ्या चार घटकाही स्वतःच्या घरीं बसलों नाहीं.

**यशवंत** : आणि यापुढं एखाद दिवस तरी पुऱ्या चार घटका घरीं बसशील कीं नाहीं कुणास ठाऊक ! घरीं तोंड धुऊन इथं–( शांता चहा घेऊन येते. )

**मोतीराम** : चहाला आलों तर काय करणार आहेस तूं ?

**यशवंत** : छे–छे–करणार काय तुझं ? सध्यां हा कोरा चहा घे. ( चहा पितां–पितां ) मोतीराम, या आदरसत्काराची सर गांवांत दुसऱ्या कुठंहि येणार नाहीं.

**मोतीराम** : मोठा शहाणा आहेस. तुझ्या बुद्धिमत्तेची चमक कांहीं और आहे. आतां आमच्याकडं ये, तुला बीनसाखरेचा चहा पाजतों बघ.

**यशवंत** : पण त्याआधीं मुंबईहून काय आणलंयूस मला तें सांग.

**मोतीराम** : सबंध मुंबई खरेदी करून आणलीय्, चल येतोस घरीं ?

**यशवंत** : मग येणारच. चल बघूं. ( चहाचा कप खालीं ठेवतो. )

**मोतीराम** : चल तर.

**यशवंत** : शांता येतों मी लवकर. आणि कायरे, शांतासाठीं काय आणलंय्स ?

**शांता** : आतां सरळपणानं जाशील का ?

**यशवंत** : हा काय निघालों. चल रे.

**मोतीराम** : चल.

[ यशवंत पुढं व मोतीराम मागून जाऊं लागतात. दारापर्यंत जाऊन मोतीराम मागं वळून पहातो. शांताची अन् त्याची दृष्टादृष्ट होते. दोघंही नकळत हंसतात. मोतीराम जातो. शांता कपबशी घेऊन घरांत जाते. बाहेरून शंकर आणि उमा येतात. शंकर—वय २७–२८ च्या दरम्यान. थोड्याशा घुश्शांतच येतो. उमा वय २२–२३. शांत वृत्तीची. ]

**शंकर** : पाहिलंस ? धडपणं बोललासुद्धां नाहीं माझ्याबरोबर.

**उमा** : उगांच कांहींतरी काय म्हणतां ? मोतीरामभाऊ आतां बोलले नाहींत तुमच्याबरोबर ?

**शंकर** : बोलला ! जुलुमाचा रामराम केला समोर दिसलों म्हणून.

**उमा** : तुमचा स्वभावच जगावेगळा.

**शंकर** : भलत्याच बाबतींत मत बदलण्याइतका मी मूर्ख नाहीं. चांगलं ओळखतों मी सगळ्यांना ! चांगल्या नोकरीला आहे ना ? तेव्हांच एवढा चढेलपणा आहे अंगांत !

**उमा** : मोतीरामभाऊंचा तरी स्वभाव तसा खास नाहीं.

**शंकर** : तो कसा आहे तें तुझ्यापेक्षां मला चांगलं ठाऊक आहे. लहानपणापासून याच गांवांत वाढलों आहोंत आम्हीं.

**उमा** : तुमचा एखाद्याविषयीं एकदां गैरसमज झाला म्हणजे तुम्हीं काय वाटेल ते तर्क करीत बसतां त्यांच्याविषयीं.

**शंकर** : या गांवांतील लोकांच्या स्वभावाची तुला कल्पना नाहीं. मला चांगली पारख आहे. मोतीरामच्या घराण्याशीं तर आमच्या घराण्याचं केव्हांच पटलं नाहीं. बापू आणि काका सरळपणानं बोलतांना कधीं ऐकलं आहेस ? यशवंताच्या दोस्तीमुळं मोतीराम इथं येतो; म्हणूनच मी कांहीं बोलत नाहीं. बाकी त्याचं इथं येणंजाणं मला अगदीं पसंत नाहीं.

**उमा :** तुम्हीं जरा हळूं बोला पाहूं ! शांताताईनं ऐकलं तर वाईट वाटेल तिला.

**शंकर :** मग ऐकेना ऐकलं तर ! जें बोलायचं असेल तें स्पष्ट बोलतों मी नेहमीं. मला पर्वा नाहीं कुणाच्या रागालोभाची.

**उमा :** तुमच्या या असल्या विचित्र वागण्यामुळं मला मात्र सगळ्यांशीं मिळतं जुळतं घ्यावं लागतं.

**शंकर :** तो तुझा दुबळेपणा आहे. कुठल्याही बाबतींत कमीपणा पत्करायला मी तयार नसतों. जेवण तयार झालं कीं नाहीं तें पहा आधीं.

**उमा :** शांताताई–( शांता येते. )

**शांता :** काय वहिनी ?

**उमा :** जेवण झालं ना ?

**शांता :** फक्त भाजी व्हायचीय !

**शंकर :** म्हणजे अजून जेवण तयार नाहीं ?

**उमा :** ती एकटी काय करणार ? आतां होईल जेवण.

**शंकर :** सगळं कांहीं वेळेवर झालं असतं. पण मध्येंच चहापाण्याचा कार्यक्रम आटोपलेला दिसतोय.

**उमा :** तुम्हीं आतां गप्प बसा पाहूं थोडा वेळ.

**शंकर :** त्यापेक्षां आजचा दिवस उपाशीच रहा असं सांग ना ! त्यालाही माझी तयारी आहे. मोतीरामचा आदरसत्कार झाला त्या निमित्तानं मला उपास करायलाच हवा.

**शांता :** चहांत दूधसुद्धां नव्हतं.

**शंकर :** कोरा चहा दिलास कीं शिरापुरी वाढलीस तें नव्हतं मी विचारलं तुला.

**उमा :** माझं ऐकतां का आतां जरा तुम्हीं ?

**शंकर :** कांहीं सांगूं नकोस. तुझ्याकडून तत्त्वज्ञान ऐकण्याची माझी इच्छा नाहीं.

( रागानं निघून जातो. )

**उमा :** शांताताई !

**शांता :** वहिनी !

**उमा** : वेडे रडूं नकोस. केव्हां केव्हां मनाविरुद्ध अशा गोष्टी घडतातच.

**शांता** : पण वहिनी, दादानं इतकं रागवायला नको होतं.

**उमा** : त्यांचा स्वभाव आजचाच तसा आहे का ? दुसऱ्यांच्या भावनांची ते कधींच कदर करीत नाहींत. माहेरीं किती लाडांत वाढलेली मी–पण इथं मला सुद्धां उणी–अधिक उत्तर सहन करावीं लागतात नाहीं का ?

**शांता** : वहिनी, तुझी गोष्ट वेगळी आणि माझी वेगळी. तुमच्या संमतीशिवाय मी कधीं घरांतल्या वस्तूंचा वापर केला आहे का ?

**उमा** : तेंच–तेंच उगाच कशाला बोलते आहेस ? ते तुला रागानं बोलले, तरी मायेनं जवळ ओढणारी वहिनी आहे ना ? यशवंतभाऊना सांगूं नको हं ?

**शांता** : तुझ्यामुळं–तुझ्या मायेमुळं मी माझा पोरकेपणासुद्धां विसरून जातें. काकांची–दादाचीं बोलणी मुकाट्यानं सहन करते.

**उमा** : बोलले तर बोलूं दे. थोडे दिवस सहन कर सारं. तुझ्या वहिनीसाठीं सहन कर.

**शांता** : वहिनी—

**उमा** : लागलीस पुन्हां रडायला ? ( काका दरवाजांत येतात )

**काका** : भरल्या घरांत रडायची अवदसा कां सुचली आहे तिला ? उमा, कां रडते आहे ती ?

**उमा** : कुठं काय ? कांहीं नाहीं !

**काका** : उमा, तुलासुद्धां खोटं बोलायची फार वाईट संवय लागली आहे. जेव्हां तेव्हां तिचा कैवार घेतेस. रडायला ही काय आतां लहान आहे ? मरतांना भावानं यांना माझ्या हवालीं केलीं, मी सुद्धां 'पोरकीं–पोरं' म्हणून लहानाचीं मोठीं केलीं त्याचं ऋण हीं अशा तऱ्हेनं फेडताहेत. कां रडते आहे ती ?

**उमा** : कुठं रडतेय् ?

**काका** : मला चांगलं ठाऊक आहे. आतां पंख फुटले आहेत ना त्यांना ? शिवाय शिकवणारे पुष्कळजण आहेतच. आमचे हात शेवटीं आमच्यावरच उलटायचे. रडण्याचं कारण मला समजायलाच हवं. ( शंकर येतो )

**शंकर** : मी सांगतों तें कारण. जेवण तयार नाहीं म्हणून मी थोडं बोललों, त्याचं दुःख झालंय तिला.

**काका** : आणि उमा सांगतेय् कांहीं झालं नाहीं म्हणून. चार माणसांचं जेवण सुद्धां तुला वेळेवर करतां येत नाहीं ?

**शांता** : काका, उगाच तुम्हीही रागावूं नका. जेवण तयार आहे.

**काका** : उलटून मला उत्तर देतेस ? म्हणे रागवूं नका. उगाच नाहीं रागवत. तुम्हां भावंडांचे गूण वाया चालले आहेत ना ?

**शांता** : काय केलं आम्हीं ?

**काका** : पाहिलंस कशी उर्मट पोर आहे ती ? अजून उलट उत्तरं देतेय ! तो यशवंता येवढा वाढला, मॅट्रिकपर्यंत शिकवलासवरला, तरी अजून बापाची पेंड शिल्लक आहे असं समजून नोकरी करायचं नांव घेत नाहीं. आयुष्यभर तुम्हांला पोसण्याचा पत्कर घेतला आहे का मी ?

**शंकर** : तिचं रडण्याचं कारण वेगळंच आहे.

**काका** : काय ?

**शंकर** : आतां मोतीराम इथं आला होता. त्याला चहापार्टी झाली त्यासंबंधीं सहज बोललों मी. तर म्हणते काय ?—कोराच चहा दिला.

**काका** : मी म्हणतों, तो तरी कां दिलास ? आल्यागेल्यांना अधिकारांत पाहुणचार करायला बापानं कांहीं शिल्लक ठेवलं होतं का ? मन मानेल तशी उधळपट्टी करायला तूं काय मालकीण समजतेस स्वतःला या घराची ?

**शांता** : मालकीण नसलें तरी या घरांतलीच आहें ना ?

**काका** : घरांतली आहे म्हणे. माझ्या बापाच्या कमाईवर जगतां असंच म्हणना. वाढत्या वयाबरोबर मूर्खपणाही वाढत चालला आहे तुझा.

**शंकर** : तुम्हीं शांत व्हा पाहूं. यशवंत आल्यावर पाहूं.

**काका** : तोही तसंच बोलणार. आम्हीं जे कष्ट यांच्यासाठीं केले त्याची फेड माझ्या अब्रूचा डंका वाजवून हीं कारटीं करणार आहेत. ( यशवंत येतो. )

**यशवंत** : काय झालं काका ?—

**काका** : या तुझ्या लाडक्या बहिणीला विचार !

**यशवंत** : शांता ! काय झालं ?–( शांता एकदम आंत निघून जाते ) शांता ऽ शांता ऽ ऽ ! ! हा प्रकार तरी काय आहे ?

**काका :** समजायलाच हवा तुला प्रकार ?—मग—

**शंकर :** तुम्हीं चला पाहूं इथून. चला.

[ शंकर काकांना घेऊन जातो. उमा भ्रमिष्टासारखी उभी रहाते. ]

**यशवंत :** काय झालं वहिनी ?

**उमा :** ( गडबडून ) कांहीं झालं नाहीं—खरंच कांहीं झालं नाहीं. खरंच कांहीं झालं नाहीं.

[ उमा आंत निघून जाते. पाटोपाठ यशवंत वहिनी—वहिनी असं म्हणत म्हणत दरवाजापर्यंत जातो. पडदा पडतो. ]

## अंक १ ला समाप्त

# २

[ **स्थळ** : तेंच. सजावट कायम. ]

[ उजव्या बाजूच्या खोलींतून शंकर येतो. ]

**शंकर** : उमा, ए उमा ! ( आंतून–आलें हं )

**उमा** : ( दरवाजांत येते. ) कशाला हांक मारलीत मला ?

**शंकर** : नवरा आहें मी.

**उमा** : तुमच्याबरोबर सात पावलं चालल्या दिवसांपासून ठाऊक आहे तें मला.

**शंकर** : तेव्हां सात पावलं चाललीस, म्हणूनच आतां आयुष्यभर माझ्याबरोबर वाटचाल करायची आहे तुला.

**उमा** : माझं कर्तव्य मला कळतंय.

**शंकर** : तेव्हांच चुलीजवळ सारखी तोंड खुपसून बसलेली असतेस.

**उमा** : तुम्हीं कधीं प्रेमानं बोललां आहांत का माझ्याशीं ?

**शंकर** : बायकोबरोबर गुलगुल गोष्टी करीत रहाण्याची मला संवय नाहीं. मी आहे व्यवहारी माणूस.

**उमा** : पण मी घरांत असतें याची तरी जाणीव असते ना ?

**शंकर** : केव्हांही अन्नवस्त्राच्या बाबतींत किंवा इतर गोष्टींत तुला कशाची कमतरता आहे का ?

**उमा** : त्या सगळ्या गोष्टींपेक्षां नवऱ्याचं प्रेम स्त्रीला हवं असतं. तें प्रेमळ छत्र तिच्यावर असलं म्हणजे इतर गोष्टींची तिला पर्वा नसते.

**शंकर** : वा ! मोठी तत्त्वज्ञानी आहेस कीं !

**उमा** : माहेरीं शिकलें होतें मी सारं. पण तुमच्या घरीं येऊन विसरावं लागलं तें मला.

**शंकर** : व्यवहारी जीवन जगणाऱ्या माणसांनीं तत्त्वज्ञानाच्या भरीला पडूं नये.

**उमा** : तुमच्या घरीं येऊन तेंच शिकलें मी. आणि शिकल्याशिवाय गत्यंतरही नव्हतं. कधीं खेळीमेळीचं वातावरण नाहीं कीं आपलेपणाचा लवलेश नाहीं.

**शंकर** : तुला बगलेंत मारून मी गांवभर फिरावं, असं तुझं म्हणणं आहे कीं काय ?

**उमा** : येवढं करण्याची जरुरी नाहीं. फक्त सुखाचे चार शब्द पुरे.

**शंकर** : मघांपासून किती बोललों मी !

**उमा** : आयुष्यभर पुरेल मला !

**शंकर** : इतकं वाईट वाटून घेऊं नकोस. खुशींत असलों तर नेहमीं बोलेन.

**उमा** : मग आज कसल्या एवढ्या आनंदांत आहांत ?

**शंकर** : तुला ओळखतां येईल ?

**उमा** : कदाचित् माझ्याशीं पहिल्यानंच एवढ्या मोकळेपणानं चार शब्द बोलल्या-मुळं आनंद झाला असेल.

**शंकर** : एवढा मी मूर्ख नाहीं. माझ्या आनंदाचं कारण फार वेगळं आहे.

**उमा** : काय तें ?

**शंकर** : त्या आबा पाटलाचा—आमच्या शेताजवळचा मळा अगदीं स्वस्तांत पडला आम्हाला.

**उमा** : हें तुमच्या आनंदाचं कारण !

**शंकर** : किती दिवस त्या मळ्यावर माझा डोळा होता. त्याच्या थोरल्या चुलत्याला काकांनीं एकदां विचारलं होतं याच मळ्याबद्दल. तेव्हां तो उर्मट माझ्या काकांना काय म्हणाला होता ठाऊक आहे तुला ?

**उमा** : काय म्हणाला होता ?

**शंकर :** माझ्या मळ्यावर डोळा ठेवूं नका. तुमचाच एखादा मळा विकायची पाळी आली तर माझ्याकडं या. मी सहज विकत घेईन तो. घरांत कांहीं नसतांना लोकांना बडेजाव दाखविण्यासाठीं झाले कर्जबाजारी; लोकांनीं सारखा तगादा लावल्याबरोबर येऊन पडले काकांच्या पायावर. असला मोका मी घालवणार ? थोडक्या पैशांत मळा तर ठरवलाच, शिवाय मागची आठवण देऊन सूडही उगवला. हें दुहेरी समाधान माझ्या आनंदाला कारण झालं तर त्यांत काय मोठं नवल आहे ?

**उमा :** अडचणींत सांपडलेल्या माणसाच्या परिस्थितीचा फायदा घेण्यांत मनाच्या मोठेपणाला वाव नसतो पण !

**शंकर :** अग हे गांवांतले लोक जितके वरून सोज्वळ दिसतात, तेवढेच ते आतून कडवे असतात. त्यांच्यांत वावरल्याशिवाय त्यांच्या स्वभावाची मेख कुणालाही कळणार नाहीं. त्या बापूचा माजोरीपणासुद्धां असाच एकदां उतरायचा आहे मला.

**उमा :** बापूंबद्दल असं बोलतां ?

**शंकर :** मग काय–देव माणूस आहे तो ?

**उमा :** तुमच्या दृष्टीनं सगळ्यांची किंमत सारखीच.

**शंकर :** जेव्हां मी एखादी गोष्ट ठरवतों तेव्हां ती पूर्ण विचारानं ठरवलेली असते. गोपाळतात्या कर्तबगार म्हणून मुंबईला वावरत होते; त्यावेळीं या बापूचं आणि त्यांचं फार सख्य होतं. तेव्हां हाच बापू तात्यांना आमच्या चहाड्या सांगायचा. काकांचा आणि गोपाळतात्यांचा बेबनाव व्हायला त्यावेळीं हाच कारणीभूत होता.

**उमा :** बापूंच्या स्वभावावरून तरी ते असल्या वृत्तीचे दिसत नाहींत. किती प्रेमळ स्वभाव आहे त्यांचा !

**शंकर :** बायकांची अक्कल चुलीच्या आवाराबाहेर अपुरी असते. अग वेडे, लबाड माणसं सज्जनपणाचं स्तोम जास्त माजवतात, म्हणूनच त्यांच्या प्रेमळपणाच्या पांघरुणाखालीं लपलेला त्यांचा स्वार्थी स्वभाव कुणालाही दिसत नाहीं–उमजत नाहीं. त्यांना ओळखणारीं माणसंही तेवढींच तरबेज असावीं लागतात.

**उमा :** हें मात्र खरं आहे.

**शंकर** : मला वाटतं आज मी तुझ्याबरोबर पुष्कळच बोललों.

**उमा** : हं!

**शंकर** : बरं. मी जरा जाऊन येतों.

**उमा** : कुठं जातां?

**शंकर** : कोर्टांत. काका सकाळींच गेले आहेत. मलाही जायला हवं. आज तें शेत रजिष्टर करून घ्यायचं आहे.

**उमा** : मला काय आणणार आहांत बाजारांतून?

**शंकर** : बायकोसाठीं बाजारांतल्या वस्तू खरेदी करायला मला वेळ नाहीं. खरेदीखत आणून देईन तुला पाहिजे तर. ( हंसत हंसत जातो. )

**उमा** : ( शंकरच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पहात रहाते. ) जन्माचा जोडीदार–सुखाचा संसार!–कल्पना कल्पनेंत विरल्या. मनांतले मनोरे मनांतच राहिले

[ राग : मिश्रराग; ताल : दादरा. ]

या वादळीं; संसार–नौका
पैलतिराला जाईल का?
ओठीं हांसू–नयनीं आंसू
दुःख कुणाला समजेल का?
मनांत वसती मधूर कल्पना
कल्पनेंत त्या विरतील का?

[ गाणं संपतं. शांता येते. ]

**शांता** : वहिनी, कार्ल्यांच्या भाजींत साखर टाकली थोडी.

**उमा** : कशाला?

**शांता** : कडवटपणा मोडायला.

**उमा** : वेडी आहेस, बोलून चालून कडूं कारलीं तीं, साखरेंत घोळलीं, तुपांत तळलीं, तरी कडूच रहाणार! आटोपलं जेवण?

**शांता** : आटोपलं.

**उमा** : मग बैस जरा.

**शांता** : कुठं बसूं ?

**उमा** : माझ्या डोक्यावर.

**शांता** : तसं नव्हें—

**उमा** : मग कसं ? बैस म्हणते, बसावं आपलं.

**शांता** : बरं बाई. तुझ्या शेजारीच बसतें. ( बसते ) वहिनी, आतां तूंच गाणं म्हणत होतीस वाटतं ?

**उमा** : मी नाहीं, माझं भूत !

**शांता** : गोड आवाज आहे हं वहिनी तुझा.

**उमा** : अग, लहानपणीं मी मुंबईला होतें ना ! तेव्हां सारखीं गाणीं म्हणून सगळ्यांना भंडावून सोडायची. केव्हां केव्हां आई इतकी चिडायची, कीं बोलतां उपयोगी नाहीं. मग बाबा म्हणायचे, 'पोरीनं गाणं म्हटलं तर त्यांत तुझं काय बिघडलं ?' त्यावर आईचं उत्तर ठरलेलंच, 'उद्यां दुसऱ्याच्या घरीं जायचं आहे तिला. नाच–गाण्यांचे जलसे करायचे नाहींत.' बाजाची पेटीसुद्धां बाबांनीं आणली होती माझ्यासाठीं. पुष्कळ गाणीं पेटी वाजवून म्हणायची मी. शाळेच्या सम्मेलनांतही गायची–केवढं कौतुक व्हायचं माझं तेव्हां लोकांकडून ? पण आतां–

**शांता** : आतां काय ?

**उमा** : जेवण करतांना फक्त चुलीजवळ गाणं म्हणतें. ( दोघीं हंसतात )

**शांता** : वहिनी, चुलीजवळ गातां गातां आतां ओटीवर गायला लागलीस.

**उमा** : पण माझं गाणं ऐकतं कोण ?–आणि कौतुक करतं कोण ?

**शांता** : दुसऱ्या कुणी तुझं कौतुक नाहीं केलं तरी मी तुझं कौतुक करीन.

**उमा** : कौतुक करायला तूंच जाग्यावर रहाशील तेव्हां ना ? त्या दिवसाची आठवण आहे ना ? साध्या कोऱ्या चहावरून तुझे तीन तेरा वाजले. आतां जर मी गाणं म्हणूं लागलें, आणि तूं टाळ्या वाजवून प्रोत्साहन देऊं लागलीस; तर काय होईल ठाऊक आहे ?–दोघींनाही 'घराबाहेर' चा रस्ता दाखवला जाईल.

**शांता** : अगदीं असंच होईल. त्या दिवशीं यशवंतदादाची तूं समजूत घातलीस म्हणून ठीक झालं. नाहींतर आमची दोघां भावंडांची तीच अवस्था होणार होती.

**उमा :** जाऊं दे तो विषय. तुझं कुठपर्यंत जमलं ?

**शांता :** काय ?

**उमा :** तुला चांगलं ठाऊक आहे.

**शांता :** तूं काय म्हणतेस तेंच मला समजत नाहीं.

**उमा :** असं ? कान पिरगळून आठवण देतें–हं ! मोतीरामभाऊंबद्दल बोलतें आहें मी.

**शांता :** कान सोड अगोदर.

**उमा :** माझ्या प्रश्नाचं उत्तर ?—

**शांता :** प्रश्नच समजला नाहीं तर उत्तर काय द्यायचं ?

**उमा :** मोतीरामभाऊ काय म्हणताहेत ?

**शांता :** ते घरीं येतात तेव्हां तूं जर घरीं नसलीस तर तुझी चौकशी करतात.

**उमा :** आणि मी घरांत असलें म्हणजे तुम्हां दोघांना माझी अडचण होते, तेव्हां आडोशाला उभं राहून एकमेकांच्या खुणा चालतात, खरं ना ?

**शांता :** बघ हं वैनी !

**उमा :** तुझे सारे थेर पाहून ठेवले आहेत. पण पोरटे यजमानीण आहे मी. मला फसवण्याचा प्रयत्न करशील तर भरलीच तुझी 'लग्नघटका.'

**शांता :** त्याचीच वाट पहाते आहें ना मी !

**उमा :** भारीच फाजीलखोर आहेस ग तूं ! हे आणि काका असले म्हणजे तोंड शिवलेलं असतं. ते 'घराबाहेर' गेले मग जीभ सैल सुटते तुझी.

**शांता :** फक्त माझ्या वहिनीजवळ.

**उमा :** अंगाला हळद लावून घेण्यासाठीं हा लघळपणा आणि लाघवीपणा चालला आहे तुझा. पण फसायची नाहीं. तुझं एकदां लग्न तर जमूं दे.

(गोट्या येतो.)

**गोट्या :** जमणार–जमणार ! तुमच्यासारख्यांचा पाठिंबा असला तर माझं लग्न नक्कीच जमणार.

**उमा :** या गोट्याभाऊ.

**गोट्या :** वहिनी, गोट्या या नांवाला केव्हांच सोटा लगावला. यापुढं मनमोहन म्हणा !

**उमा :** बरंच लांबलचक होतंय हो नांव !

**गोट्या :** त्यांत तर खरी गम्मत आहे. या पल्लेदार नांवानंच लग्नाचा पल्ला गांठायचं ठरवलं आहे.

**शांता :** नक्की झालं लग्नाचं ?

**गोट्या :** जवळ–जवळ.

**उमा :** म्हणजे नक्की नाहीं !

**गोट्या :** दुधांत मिठाचा खडा काय टाकतां हो वहिनी ? मुलगी पाहून आलों मी.

**उमा :** मुलगी पाहिलीत, पण इतर बाबतींत बोलणीं झालीं का ?

**गोट्या :** पत्रिकासुद्धां जमली, मुहूर्त ठरायचा बाकी आहे.

**शांता :** छान ! आनंदाची बातमी.

**उमा :** मुलगी सुंदर आहे ना ?

**गोट्या :** कुणाची ?

**उमा :** तुमच्या भावी वधूबद्दल बोलतें आहें मी.

**गोट्या :** छत्तीस लक्षणांनीं युक्त आहे. नजरेला नजर टिकत नाहीं.

**उमा :** अर्थ नाहीं लक्षांत आला !

**गोट्या :** इथंच तर अनर्थ आहे.

**उमा :** अजून अनर्थ आहेच का ?

**गोट्या :** त्याचं असं आहे वहिनी, मी नजरेला नजर टिकत नाहीं असं म्हणालों ना ?–त्याचा अर्थ डाव्या डोळयानं चकणी आहे ती. (दोघींही हंसतात) हंसतां तुम्ही.

**उमा :** हसण्यासारखंच तर बोलतां तुम्हीं.

**गोट्या :** अहो, आतां मी सुद्धां हंसतोय्. पण तिच्या नजरेकडं पाहिल्याबरोबर माझी एकदम नजरबंदी झाली. थोडावेळ मी कुठं आहे, तें माझं मलाच कळेना. शेजारी बसलेल्या माझ्या मित्रानं, 'चहा घे' म्हणून मला सांगितलं तेव्हांच

मी भानावर आलों. माझ्या हातांत चहाचा कप देतानां पुन्हा एकदां तिनं माझ्याकडं पाहिलं; पण माझ्याकडं पहातेय् कीं माझ्याबरोबर असलेल्या मित्राकडं पहातेय् तेंच मला समजेना.

**उमा** : बरींच मोठीं गम्मत झाली म्हणायची ?—

**गोट्या** : तर हो ?–हा मनमोहन शेवटीं कुब्जेच्या तडाख्यांत सांपडला.

**उमा** : आतां तुमचं लग्न ठरलं म्हणून; नाहींतर—

**गोट्या** : नाहींतर काय !—

**उमा** : आमच्या शांताताईच्या लग्नाचा विचार आहे यंदा.

**शांता** : वहिनी—

**गोट्या** : थांबा हो तुम्हीं. त्यांना बोलायला वाव द्या. त्यांचा अवसान घात करूं नका.

**उमा** : आतां काय बोलणार ? तुमचं लग्न तर ठरलं.

**गोट्या** : होकार दिला असला, तरी नकार देऊं शकतो.

**शांता** : वहिनींचं फिरलंय डोकं. मी आपली जातें कशी. ( आंत जाते. )

**उमा** : अग थांब–ना.

**गोट्या** : नका–थांबवूं हो त्यांना ! त्यांना जर मी मागणी घातली, तर या घराचा दरवाजा मला कायमचा बंद होईल.

**उमा** : बसा हं तुम्हीं. आलें मी. ( घरांत जाते. )

**गोट्या** : लोक कोकलतात कीं मुलांच्या चौपट मुलींची संख्या आहे, पण माझ्या वाट्याला एकच आली आणि तीसुद्धां अफ्रिकेची पैदास.

[ यशवंत–मोतीराम येतात. ]

**यशवंत** : गोट्या, काय रे, एकटाच बसलायस ?

**गोट्या** : तुम्हीं आलांत आतां माझ्या जोडीला ?

**मोतीराम** : थंडा मामला दिसतोय !

**गोट्या** : थंडा मामला ? मालगाडीच्या इंजिनाचा धडधडाट सध्यां चालू आहे.

**यशवंत** : कां रे ?

**गोट्या** : गाडी रुळावर आली आहे ना ? स्टेशन लवकरच गांठणार.

**मोतीराम** : मध्येंच नकाराचा सिग्नल तर दिसणार नाहीं ना ?

**गोट्या** : मी म्हणजे अगदीं तुमच्या चेष्टेचा विषय झालों आहे. पण आतां वडे-सांबाऱ्यावर हात मारायला या.

**यशवंत** : तूं बोहल्यावर उभा रहाशील तेव्हां ना ?

**गोट्या** : तो योग आला बाबा. नवग्रह माझ्या बाजूचे आहेत. गुरुनं तर लग्नाचं वऱ्हाड डोक्यावर घेतलं आहे.

**यशवंत** : तेव्हांच तूं डोक्यानं चालायला लागलास.

**मोतीराम** : पाहिलेलं स्थळ कसं काय आहे ?

**गोट्या** : प्रेक्षणीय. मनाच्या समाधानांसाठीं, शेवटीं अफ्रिकेचं जंगल गांठलं.

**यशवंत** : दिसायला कशी काय आहे ?

**गोट्या** : लाखांत देखणी.

**मोतीराम** : शाबास ! जीते रहो पठ्ठे !

**गोट्या** : तिचं दर्शन झाल्यापासून मरायला टेकलों आहे.

**यशवंत** : म्हणजे काय ?

**गोट्या** : अप्सरा पहायला गेलों; आणि हबशीणीबरोबर लग्नगांठ पडायची पाळी आली.

**यशवंत** : लग्नाअगोदर असली भाषा ?

**गोट्या** : लग्न ठरल्यावर लोक आनंदानं हंसतात. पण मी दुःखानं रडतोय.

**मोतीराम** : सरळपणानं सांग काय तें !

**गोट्या** : सरळपणानं सांगू ? ऐका तर !–माझी जिच्याशीं दैवयोगानं गांठ पडली आहे, तिच्या सौंदर्याची रुपरेषा, मी अगदीं थोडक्यांत समजावून सांगतों. कोळशालाही लाजवील असा तिचा रंग आहे, जाडी आणि उंची भोपळ्याशीं स्पर्धा करणारी, केसांचं कुरण कपाळावर उगवलेलं, बत्तीशींतले दोन सुळे हत्तीच्या सुळक्यांप्रमाणं पुढं आले आहेत. बटाट्याप्रमाणं बटबटींत डोळे आणि–

**यशवंत** : बस–बस–बस ! बाकींचं वर्णन न सांगतां समजण्यासारखं आहे.

**गोट्या** : मला आंवरू नका. तुम्ही जरी तिला पाहिलं नसलं, तरी पण मी तिचं असं वर्णन करतों, कीं माझ्या वधूचं जिवंत चित्र तुमच्यासमोर उभं राहिलं पाहिजे.

**मोतीराम** : मनमोहना, मन मोहून टाकणार हें वर्णन एकदम बदं कर–नाहींतर–

**गोट्या** : राहिलं ! माझं कोळशांतलं माणिक उघड्यावर टाकण्याची माझी इच्छा नाहीं.

**यशवंत** : गोट्या, इतके दिवस मुंबईला होतास, तेवढ्यांत तुझ्यासारख्या लंग्रा वीराचं प्रेम जमायला हवं होतं !

**गोट्या** : अरे बाबा, तसा प्रयत्न मी मुंबईला केला नाहीं, असं वाटतं कीं काय तुम्हाला ?

**मोतीराम** : म्हणूनच ना टाळक्याला बाशींग लागलं नाहीं.

**गोट्या** : तुमच्या शंकेचं निरसन मला केलंच पाहिजे. दोन पैशाचा पिवळा हत्ती तोंडांत धरून, आणि सांखळींत अडकविलेल्या चाव्या बोटावर गरगर फिरवीत, मुंबईच्या गल्लीबोळांतून भापूगिरी केली आहे मी. मुलींच्या शाळा सुटण्यांच्या वेळीं, पॅन्टच्या खिशांत हात घालून, अंग घुंसळींत उभा राहिलों आहे. संध्याकाळीं दादरच्या पुलावरून, थेट शिवाजी पार्कवरून समुद्रकिनाऱ्यावर फेऱ्या मारल्या आहेत मी.. पण एकाहि प्रीतिदेवतेनं या पुजाऱ्याकडं नुसता कानाडोळा करून सुद्धां पाहिलं नाहीं. दिवसामागून दिवस जात होते, अपयश हात धुवून पाठीमागं लागलं होतं. पण माझ्या कार्यक्रमांत कधीं खंड पडला नव्हता.

**यशवंत** : अरेरे ! केवढा हा दैवदुर्विलास !

**गोट्या** : संपला नाहीं अजून तो सांगून ! पुढं तर ऐका. एके दिवशीं मात्र चमत्कार झाला. मी ज्या हॉटेलच्या कोंपऱ्यावर उभा राहायचा, त्याच्या समोरच्या चाळींतील, चौथ्या मजल्यावरच्या गॅलरींत, एक मस्त पोरगी उभी रहायची. त्या दिवशीं मला पाहून ती हंसली. माझं हृदय घुसळून निघालं. खिशांतला रंगीबेरंगीं रुमाल काढून चेहरा पुसून टाकला. मालगाडीच्या इंजिनाप्रमाणं सिगारेटचा धूर सोडून दिला. वठलेल्या वृक्षाला आज नवजीवन लाभलं होतं.

**मोतीराम** : प्रयत्नांती परमेश्वर—

**गोट्या** : प्रयत्नांती पोरगी म्हण ! रोज आमच्या हास्याच्या फैरी झडूं लागल्या, परिटघडीचे कपडे अंगावर आले. केसाचा मोरतुरा डोक्यावर उगवला. पिवळ्या हत्तीची जागा कॅप्स्टननं घेतली—

**मोतीराम :** " कॅप्स्टनच्या रिकाम्या पाकीटांत पिवळा हत्ती " असंच ना ?

**गोट्या :** ऐकरे ! एक दिवशीं काय झालं ? ऐन रुबाबांत उभा राहून मी तिला हातवारे करीत असतांना, तिच्या खाष्ट म्हातारीनं, मोरीत ओतायची घाण-पाण्याची बादली माझ्या डोक्यावर ओतून मला सचैल स्नान घातलं. त्या वेळीं ती चवचाल पोरगी माझ्याकडे बघून फिदिफिदी हंसत होती.

**यशवंत :** ती पोर हंसत होती ?–

**गोट्या :** होय रे ! बत्तीशीं विचकून तेवढ्यावर भागलं नाहीं. प्रीतिशास्त्राचे आडाखे माहीत नसलेला तिचा आडदांड भाऊ खालीं आला आणि माझी मानगुटी धरून बजावलं त्यानं, ' उद्यां असा मूर्खपणा करशील, तर सगळीं हाडें मुटीं करून टाकीन. ' माझ्या पहिल्या–वहिल्या प्रेमाचा असा शेवट. झाला ! दुसऱ्या दिवशीं मुंबईला रामराम ठोकला आणि सरळ गांव गांठला.

**मोतीराम :** असं जरी असलं तरी या ठरलेल्या मुलीशीं लग्न करूं नकोस तूं.

**गोट्या :** माझ्या मित्रांनों, ब्रह्मदेवानं माझ्या नांवावर पाठवलेलं हे पार्सल, लग्न–रूपानं हजार बाराशेंचा भूर्दंड भरून मला स्वीकारायलाच हवं. जातों मी.

**यशवंत :** एवढी घाई आहे ?

**गोट्या :** माझ्यासाठीं धडपडणारं नात्याचं असं कुणीच नाहीं. तुमच्यासारखी मित्रमंडळी फक्त लग्नादिवशीं येणार; किंवा आहेर चुकविण्यासाठीं ' आम्हांला जरूरीच्या कामासाठीं बाहेर जावं लागलं रे गोट्या ' असं लग्नानंतर सांगणार !

**मोतीराम :** आम्हींही त्यांतलेच ?

**गोट्या :** घोडा मैदान दूर नाहीं. हें बघा, जातां जातां एकच सांगतों, लग्नाला नाहीं आलांत तरी चालेल, पण आहेर पाठवायला विसरूं नका !

[ गोट्या घाईनं जातो. दोघेही हंसतात. उमा आंतून येते. ]

**उमा :** गोट्याभाऊ गेले वाटतं ?

**मोतीराम :** त्यांची लगीनघाई चालू आहे ना ?

**उमा :** काय भाऊ, हल्लीं आमच्याकडे यायला तुम्हांला सवड सांपडत नाहीं ना ?

**मोतीराम :** आज आलों नाहीं का ! रोज येण्यानं माझ्यावरून भांडणं व्हायला नकोत.

**उमा** : त्यांचा स्वभावच तसा आहे.

**मोतीराम** : दुसऱ्याच्या मनाविरुद्ध वागणं मला आवडत नाहीं.

**उमा** : अगदीं परक्यासारखे बोलायला लागलांत !

**मोतीराम** : परकेपणा निर्माण झाल्यावर परक्यासारखं वागावं लागतं. आज तुम्ही बोलावल्याचं यशवंतानं सांगितलं म्हणून आलों मी.

**उमा** : अशा साध्याशा कारणानं जर आपण एकमेकांपासून दूर राहूं लागलों, तर आपला आजपर्यंतचा घरोबा टिकायचा कसा ?

**यशवंत** : मी सुचवूं कां उपाय ?

**उमा** : सुचवा ना !

**यशवंत** : कांहींतरी गोडगोड खायला दे आम्हांला. जगांतले मोठमोठे वाद मेजवानी दिल्यानं मिटले आहेत. बोला, मी सुचविलेला तोडगा कसा काय आहे ?

**मोतीराम** : विचारांत घेण्यासारखा......

**यशवंत** : आहे म्हण. नाहीं तर......

**उमा** : खायला मिळणार नाहीं असं वाटलं कीं काय तुम्हांला ?

**यशवंत** छे ! छे ! तुझ्यासारखी प्रेमळ वहिनी......

**उमा** : थांबा–थांबा ! वहिनीचा प्रेमळपणा उगाच उधळूं नका, त्या अगोदर माझं काम केलंत तुम्हीं ?

**यशवंत** : कसलं काम ?

**उमा** : चेनचा तुटलेला फांसा लावून आणायला सांगितलं होतं ना पेढीवरून ?

**यशवंत** : अरे हो; विसरूनच आलों. आतां घेऊन येतों तोपर्यंत —

**उमा** : मुगाचे लाडू आणि कॉफी तयार ठेवतें.

**यशवंत** : थँक्स व्हेरी मच् ! आलोंच मी. बैस हं मोतीराम ( जातां जातां ) कॉफी कडक कर हं ? ( जातो )

**मोतीराम** : हा तुमचा लाडका दीर......

**उमा** : तसाच तुमचा मित्र आणि मेहुणा. ( जायला निघते. )

**मोतीराम** : मला चारीमुंडे चित करून चाललांत कुठं ?

**उमा** : समजेल थोड्या वेळानं

**मोतीराम** : एकटाच बसूं ?—

**उमा** : अर्थ लक्षांत आला.

**मोतीराम** : तसं कांहीं नाहीं हं !

**उमा** : नाहीं ना ? मग तो स्त्री मासिकाचा अंक वाचीत बसा.

[ उमा आंत जाते. मोतीराम हंसत हंसत अंक उचलतो. अंक चाळींत असतांना पुढील गाणं गुणगुणतो. ]

[ राग : मांड; ताल : धुमाळी ]

सखे, नयन तुला शोधिती !
अविचल आपुलीं जडती नातीं ॥ धृ० ॥
सागर सरिता संगम सुंदर !
पैल तीरावरी बांधूं मंदीर !
फळाफुलांनीं लता डोलती ॥ १ ॥

[ गाणं संपतं—मोतीराम बसतो. इतक्यांत आतून शांता कॉफी आणि बशीतून लाडू आणते. ]

**शांता** : कॉफी घेणार ना ?

**मोतीराम** : कुणांसाठीं ? माझ्यासाठीं !

**शांता** : मग दुसरं कोण आहे इथं ?

**मोतीराम** : तूं आणि मी ! ( चहा लाडू ठेवते. )

**शांता** : या घरांत मी आहे याची आठवण आहे तर तुम्हांला ?

**मोतीराम** : आठ दिवसांनीं आलों म्हणून हा टोमणा आहे वाटतं ! क्षमा कर हं त्याबद्दल.

**शांता** : क्षमेची याचना मग, पहिल्यांदा कॉफी घ्या नाहीं तर थंड होईल ती.

**मोतीराम** : पण तूं गरम कशाला होतेस ? नांवाचं आणि वागण्याचं थोडं तरी साम्य दाखव.

**शांता** : लाडीगोडी करून बायकांचा राग कसा घालवावा ही कला पुरुषांना चांगली साधलेली असते.

**मोतीराम** : पण तुझ्यावर त्या कलेचा अजून कांहीं उपयोग झालेला दिसत नाहीं. हंसलीस ना ? मग उपयोग नक्कीच झाला.

**शांता** : हंसलें तरी राग कांहीं अजून गेला नाहीं.

**मोतीराम** : एकीकडं हंसायचं आणि मी रागावलें आहे म्हणून सांगायचं, हा निव्वळ पोरकटपणा झाला.

**शांता** : माहित आहे मला.

**मोतीराम** : मग कदाचित माझी चूक होत असेल.

**शांता** : आठ दिवसांत भेटावंसं वाटलं नाहीं वाटतं ?

**मोतीराम** : रोज तर भेटत होतीस.

**शांता** : केव्हां ?

**मोतीराम** : स्वप्नांत ! दिवसरात्र तुझंच चिंतन चाललेलं असतं.

**शांता** : या गोष्टी दुसऱ्या कुणालातरी शिकवा, मला काय भोळसट समजतां ?

**मोतीराम** : तुला भोळसट समजण्याइतका, मी भोळा नाहीं. तूं हुशार आहेस हें समजण्याइतका मी हुशार आहें.

**शांता** : स्वतःपुरती हुशारी दुसऱ्याला फायदेशीर ठरत नाहीं.

**मोतीराम** : मग तुझ्यासाठीं काय करावं मी असं तुझं म्हणणं आहे ?

**शांता** : हा प्रश्न माझ्यापेक्षां स्वतःलाच विचारलांत तर फार बरं होईल.

**मोतीराम** : बरं बुवा ! मी हरलों. झालं तुझं समाधान ?

**शांता** : तेवढं कबूल केलंत म्हणजे सारं संपलं.

**मोतीराम** : मग तुझ्या समाधानासाठीं मी काय करूं ?–( शंकर येतो. )

**शंकर** : एकमेकांना मिठ्या मारून घराचा रंगमहाल करून टाका !

**शांता** : दादा आला. ( एवढं अस्पष्ट बोलून आंत जाते. )

**शंकर** : मी आल्यानं रंगाचा बेरंग तर झाला नाहीं ना ?

**मोतीराम** : किती उपरोधिकपणानं बोलतो आहेस शंकर ?

**शंकर :** माझ्या उपरोधिक बोलण्यापेक्षां तूं जें चालवलं आहेस तें योग्य आहे का ?

**मोतीराम :** लहानपणांपासून या घराचे आणि माझे संबंध जिव्हाळ्याचे आहेत.

**शंकर :** ते जन्माचे जोडण्याचा विचार चालला आहे ?

**मोतीराम :** भवितव्यतेच्या पोटांत काय दडलेलं आहे तें मला सांगतां येणार नाहीं.

**शंकर :** पण तुझ्या पोटांत काय दडलं आहे त्याचा थांगपत्ता मला लागला आहे.

**मोतीराम :** मत्सरी माणसाच्या दृष्टीनं या जगांत चांगली अशी कोणतीच गोष्ट असूं शकत नाहीं.

**शंकर :** प्रेमानं आंधळा झालेल्या माणसाला, सारं जगच आंधळं आहे असं वाटतं ! मोतीराम, आमचं घर म्हणजे धर्मशाळा वाटतें कीं काय तुला ? कुणीही प्रवाशानं यावं आणि वाटेल तसा धिंगाणा घालावा ?

**मोतीराम :** धर्मशाळेचे प्रवासी क्षणाचे असतात. इथं जन्माच्या गांठीं आहेत.

**शंकर :** त्या कशा सोडवायच्या आणि सुटत नसतील तर कशा तोडायच्या, याचं मला चांगलं ज्ञान आहे.

**मोतीराम :** माझ्या बाबतींत तूं जी एवढी कडक विरोधी भूमिका घेतली आहेस त्याचं कारण तरी काय बुवा ?

**शंकर :** योग्य वेळीं याचं उत्तर मिळेल. तुला इथं यायचंच असेल, तर आमच्या घराण्याच्या परंपरेला साजेल असंच वागायला पाहिजे.

**मोतीराम :** तुझ्या घराण्याला परंपरा आहे आणि आम्हीं उचले म्हणून रहातों कीं काय या गांवांत ?

**शंकर :** उचले कीं जहागिरदार आहांत तें पहाण्याची मला गरज नाहीं.

**मोतीराम :** तसंच दुसऱ्यांकडून भलतीच हुकमत गाजवून घेण्याची माझीहि तयारी नाहीं.

**शंकर :** माझ्या घरीं येऊन माझ्यावरच शिरजोरी करतोस ?

**मोतीराम :** हा शिरजोरीचा प्रश्न नाहीं प्रत्येकाला स्वाभिमान आहेच.

**शंकर :** माझ्या घरीं येऊन मलाच स्वाभिमानाच्या गोष्टी ऐकवणाऱ्या माणसाला मी कवडीचीहि किंमत देत नाहीं.

**मोतीराम :** याच शब्दांत मलाही तुला उत्तर देतां येईल.

**शंकर :** पण तें माझ्या घरीं नाहीं. तुझ्या घरीं येईन तेव्हां !

**मोतीराम :** असला माजोरीपणा विनाशाची वाटचाल करतो. प्रेमानंच दुसऱ्याला जिंकतां येतं.

**शंकर :** तुझ्याकडून मी मैत्रीची अपेक्षाच करीत नाहीं मग प्रेमाचा प्रश्न आला कुठं ?

**मोतीराम :** एक दिवस याचंही उत्तर देईन तुला.

**शंकर :** आयुष्यभर वाट पाहिलीस तरी ती संधी तुला लाभणार नाहीं. जा– शहाणा हो ! आपल्या मूर्खपणाचं प्रदर्शन माझ्यासमोर करूं नकोस. ( उमा येते. )

**मोतीराम :** शंकर !

**उमा :** काय झालं एवढं मोठमोठ्यानं भांडायला ?

**शंकर :** त्याची चौकशी तुला कशाला ? बायकांनीं चूल सांभाळायची असते. ओट्यावर येऊन पुरुषी व्यवहारांत तोंड खुपसायचं नसतं.

**उमा :** मला कांहींच विचारण्याचा अधिकार नाहीं का ?

**शंकर :** बायकांचं अधिकारक्षेत्र ठरलेलं असतं. तें क्षेत्र ओलांडण्याचा त्यानीं कधींहि प्रयत्न करूं नये.

**उमा :** म्हणजे तुमची पत्नी या नात्यानंहि माझ्या शब्दांना कांहीं किंमत नाहीं ?

**शंकर :** बायकांच्या शब्दाला किती किंमत द्यायची तें नवऱ्याच्या मर्जीवर अवलंबून असतं.

**मोतीराम :** वहिनी, उगाच शब्दांचा कीस हवा कशाला ? असला घमेंडखोर-पणा सगळ्यांच्या सहानुभूतीला पारखा होतो.

**शंकर :** दुसऱ्याच्या सहानुभूतीवर जगण्याची पाळी अजून या शंकरवर आलेली नाहीं. आणि तशीच वेळ आली तर तूं माझ्याकडं सहानुभूतीनं पहावंस अशी अपेक्षा मी कधींही करणार नाहीं.

**मोतीराम :** व्यवहारी जगांत, प्रत्येकजण आपल्यापरीनं जगत असतो. पण आयुष्यांत असा एखादा प्रसंग येतो कीं, तेव्हां दुसऱ्याच्या साहाय्याची गरज लागतेच. वहिनी, जातों मी. [ एकदम निघून जातो. ]

**उमा** : भाऊ–भाऊ—

**शंकर** : प्रेमाचं प्रदर्शन बस झाल. जा, आपलं काम कर जा.

**उमा** : तेंच आहे माझ्या नशिबीं.

**शंकर** : मग काय तुला डोक्यावर घेऊन घरभर नाचत सुटूं? बायकांच्या शब्दाच्या तालावर नाचणारा बाईलवेडा नवरा मी नाहीं. माझ्या शब्दाबरहुकूम तूं वागायला पाहिजेस !

**उमा** : तुमच्या मनाविरुद्ध कोणती गोष्ट केली आहे मी ? या घरांत आलें आणि तुमच्याप्रमाणंच वागलें. माझ्या आवडीनिवडीचा कधीं विचारसुद्धां मनांत आणला नाहीं तुम्हीं.

**शंकर** : तुझ्या शिरावर कुणीं तलवार धरलेली नाहीं. योग्य तें स्वातंत्र्य तुला आहे.

**उमा** : तुमच्या हुकमतीच्या पिजऱ्यांत डोकं आपटीत बसणं हेंच माझं स्वातंत्र्य.

**शंकर** : ज्या नवऱ्यानं बायकोला संपूर्ण स्वातंत्र्य बहाल केलं, त्याला गुलामाइतकीहि किंमत रहात नाहीं. पायांतली वहाण पायांतच शोभून दिसते. डोक्यावर नाहीं ! आणखी फाजीलपणा करून माझं डोकं भडकवूं नकोस.जा. ( बापू येतात. )

**बापू** : मला आंत यायला परवानगी आहे ना ?

**उमा** : या ना बापू.

**बापू** : नाहीं म्हटलं तुम्हीं नवराबायको बोलतां आहांत, माझ्यासारख्यानं एकदम कसं आंत यावं ?

**उमा** : बसा हं तुम्हीं. मी जातें घरांत. ( जाते )

**बापू** : काय शंकरराव ! तुम्हीं गप्प कां ?

**शंकर** : सहज !

**बापू** : असं तुटकपणानं काय बोलतोस ? भांडलां तर नाहींना ? असं असेल तर मी समेट करून देतों. ( काका येतात. ) या काकासाहेब.

[ शंकर आंत जातो. ]

**काका** : कसला समेट करायला आला आहांत ?

**बापू** : कसला समेट आणि कसलं काय ? सहज थट्टेनें बोलत होतों शंकरपाशीं. कसं काय चाललंय तुमचं ?

**काका** : आमचं ठीक चाललंय. पण तुम्हीं जें चालवलं आहांत तें शोभतं ना तुम्हांला ?

**बापू** : तुम्हीं काय म्हणतां तेंच माझ्या लक्षांत आलं नाहीं.

**काका** : कसं लक्षांत येणार ? जाणूनबुजून केलेल्या गोष्टी लक्षांत येणार कशा ?

**बापू** : तुम्हीं काय बोलायचें असेल तें स्पष्ट बोला.

**काका** : आबा पाटलाला पैसे कुणी दिले ?

**बापू** : मी दिले थोडेसे पैसे त्याला ?

**काका** : एवढं कर्णाचं औदार्य आहे तुमच्याजवळ ?

**बापू** : कर्णाचं औदार्य कसलं ? माझ्याकडं आला, गयावया करायला लागला, म्हणाला, ' बापू, आजारीपणांत लोकांचं देणं झालं, त्यांचा तगादा लागला आहे. सोन्यासारखा एक शेताचा तुकडा तोहि विकावा लागणार.' मी म्हणालों, ' वेड्या, शेत विकून काय करणार ? उद्यां उपाशीं मरणार ना ? शेत विकूं नकोस. मी देतो पैसे. सवडीनं थोडेथोडे देत जा.'

**काका** : मोठा दानशूरपणा दाखवलांत ?

**बापू** : दानशूरपणा कसला ? एकाच गांवांत लहानाचे मोठे झालों. आपण संकटाच्या वेळीं एकमेकांना मदत नको का करायला ?

**काका** : त्याला मदत करून आमचा मात्र बरोबर दावा साधलांत.

**बापू** : म्हणजे ?—म्हणतां काय तुम्हीं ?

**काका** : काय म्हणतों तें नीट कान उघडे ठेवून ऐका. त्याचा माझा कालच व्यवहार ठरला होता. आज खरेदीपत्र होणार होतं. पण आयत्यावेळीं तुम्हीं त्याला पैसे दिल्यामुळं ठरलेला व्यवहार मोडला. कचेरींत वाट पाहून दमलों आणि शेवटीं घरीं आलों. वाटेंत हा सारा प्रकार मला समजला.

**बापू** : पण मला हें माहीतच नव्हतं.

**काका** : समजून—उमजून मुद्दामच केलं आहे सारं. आतां वर हा कांगावा कशाला ?

**बापू** : मला जर हें अगोदर समजलं असतं. तर हा व्यवहार मी केलाच नसता. आबा पाटलानं तरी हें मला सांगायला पाहिजे होतं.

**काका** : या गोष्टी तुम्हीं मला शिकवूं नका. मुद्दामच केलेल्या गोष्टी आहेत.

**बापू** : पुरावा पाहिजे असेल तर आत्ता पाटलाला तुमच्यासमोर उभा करतों.

**काका** : पुराव्या आराव्याची कांहींही जरूरी नाहीं. कांहीं फुकट घेणार नव्हतों मला. चांगले पैसे मोजणार होतों.

**बापू** : पण मी कुठं म्हणतोंय तसं? उगाच गैरसमज करून घेतां आहांत माझ्याबद्दल.

**काका** : बापू! तुमच्याबद्दल चांगला समज आहे माझा. तुमच्या—आमच्या घराण्याचं पूर्वापार कधीं पटलंय? तुम्हीं तो वारसा चालवणारच.

**बापू** : मी तुमचं नुकसान केल्याचा पुरावा तुमच्याजवळ आहे का?

**काका** : उघडपणानं नाहीं पण दाणें टाकून कोंबडे झुंजविण्याची कला तुम्हांला चांगली साधली आहे. मानापमानाच्या बाबतींत, जागा जमिनीच्या बाबतींत तुमच्या आमच्या घराण्याचा वाद होताच.

**बापू** : झाल्या गेल्या गोष्टी उकरून उगाच वादविवाद वाढविण्यांत अर्थ नाहीं. प्रत्यक्ष तुमच्या आमच्यांत तर कधीं वादविवाद झाला नाहीं ना? आणि या घराण्यांच्या "तेढीवर" कायमचा पडदा टाकण्याच्या उद्देशानंच आज मी इथं आलों आहें.

**काका** : कसला उद्देश?

**बापू** : शांता संबंधानं तुम्हांला भेटायला आलों आहें.

**काका** : शांतासंबंधानं?

**बापू** : हो. यंदा मोतीरामाच्या लग्नाचा विचार आहे; तेव्हां शांताला मागणी घालायला आलों आहें असंच म्हणायला कांहीं हरकत नाहीं.

**काका** : नाहीं—नाहीं. ही सोयरीक जुळणं केव्हांही शक्य नाहीं.

**बापू** : कां जुळणं शक्य नाहीं?—

**काका** : तो आमच्या घराण्याचा—इज्जतीचा प्रश्न आहे.

**बापू** : म्हणजे?—आमचं घराणं तुमच्या तोला—मोलाचं नाहीं का?

**काका** : आमच्यापेक्षां हजार हिश्यानीं श्रेष्ठ असलं तरी सुद्धां शांताला तुमच्या घराण्यांत देणार नाहीं.

**बापू** : पण गोपाळ हयात असतांना त्यानंच तसा शब्द मला दिलेला आहे.

**काका :** गोपाळाबरोबर त्याचा शब्दही नाहींसा झाला. आतां सारं कांहीं माझ्या मर्जीवर अवलंबून आहे.

**बापू :** पण यशवंताचा या गोष्टीला विरोध नाहीं.

**काका :** त्याचा होकार–नकार विचारांत घेण्याची मला गरज नाहीं.

**बापू :** शांताचा भाऊ या नात्यानं तिच्या सुखदुःखाची काळजी त्याला असणारच.

**काका :** आणि मी कोण ? चुलता आहे कीं कसाई ? लहानपणांपासून त्यांच्या सुखासाठीं झटलों त्याला कांहींच किंमत नाहीं ?

**बापू :** तुम्हीं त्या 'पोरक्या पोरांसाठीं' केलेल्या कष्टांची त्यांना चांगलीच जाणीव आहे.

**काका :** तेंच तर इतरांना खपत नाहीं. माझ्याविरुद्ध खोटंनाटं सांगून त्यांचं मन कलुषीत करताहेत.

**बापू :** नालायक लोकच असल्या गोष्टी करतील !

**काका :** कुणाची काय लायकी आहे हें मी चांगलं ओळखून आहें. तोंडदेखत सर्वजण असंच बोलतात. पण पाठीमागं कान फुंकायचीं कामं बरोबर करतात. अलिकडं पहातोय् मी, तीं दोन्हीं पोरं चढेलपणानं वागायला लागलीं आहेत. पण हा काका सरळ आहे तोपर्यंत ठीक. नाहींतर एक घांव आणि दोन तुकडे ! मी कुणाचा मिंधा लागत नाहीं.

**बापू :** तुमचा झालेला गैरसमज मला कांहीं ठीक दिसत नाहीं. गुणीं पोरं आहेत तीं. अशीं वागतील असं मला खात्रीनं वाटत नाहीं.

**काका :** म्हणजे माझ्या शब्दावर तुमचा विश्वास नाहीं ? पण आमच्या घरांत काय काय चालतं तें आमचं आम्हांलाच माहीत. त्यांना हल्लीं समजुतीच्या चार गोष्टीसुद्धां पसंत पडत नाहींत. सापासारखीं उलटून पडतात.

**बापू :** बापापाठीं मागं तुम्हींच सांभाळलंत, रागरुसवा तुमच्या जवळ नाहीं तर कुणाजवळ करणार ?

**काका :** हे तुम्हीं मला सांगूं नका. या रागरुसव्याच्या पाठीमागं काय कारस्थान शिजतं आहे तें मला चांगलं ठाऊक आहे, पण मी सुद्धां खंबीर आहें ! थोडे दिवस सरळपणानं वागतात कीं नाहीं तें पाहीन नाहींतर माझ्या घराचा दरवाजा सताड उघडा आहे.

**बापू :** काका, असले विचार मनांत आणूं नका. आजपर्यंत जसं सांभाळलंत त्याचप्रमाणं त्यांना आपापल्या मार्गाला लावा, आणि आपल्या कर्तव्यांतून मोकळे व्हा.

**काका :** माझं कर्तव्य मला कळतं. मला कर्तव्य समजावण्यापेक्षां ह्या पोरांनाच चार समजुतीच्या गोष्टी सांगा !

**बापू :** ओघा–ओघानं जमेल सारं. बरं–काका ! मी विचारलेल्या प्रश्नाबद्दल तुमचा शेवटचा निर्णय काय आहे ?

**काका :** मी मघांशीं सांगितला तोच माझा शेवटचा निर्णय ! माझ्या शब्दांत बदल करायची माझी तयारी नाहीं.

**बापू :** हेंच तुमचं शेवटचं उत्तर आहे ?

**काका :** हो–हेंच.

**बापू :** ठीक ! यशवंताला भेटून त्याच्या कानावर ही हकीगत घालायलाच हवी. ( यशवंत येतो. )

**काका :** त्याला भेटायला पुन्हा येण्यापेक्षां तो प्रत्यक्षच हजर झालाय् ! कायरे यशवंत, शांतासंबंधानं यांनीं विचारलं तेव्हां तूं यांना काय उत्तर दिलंस ?

**यशवंत :** तुम्हांला भेटायला सांगितलं होतं.

**बापू :** त्याप्रमाणं मी भेटलोंही.

**काका :** यशवंता, या गोष्टीला मी नकार दिला तर तुझं काय म्हणणं आहे ?

**यशवंत :** पण—

**काका :** पण काय ?

**यशवंत :** बाबा हयात असतांना त्यांनीं तसं ठरवलं होतं. शिवाय शांतालाही पसंत आहे, तेव्हां—

**काका :** तुझाही पाठिंबा आहे असंच ना ? पण तुला अगर शांताला जरी हें पसंत असलं, तरी मी ही गोष्ट करायला केव्हांही तयार नाहीं.

**यशवंत :** पण यांत अयोग्य असं काय आहे ?

**काका :** उलट तोंड करून मला जाब विचारतोस ? एवढा उर्मटपणा आला तुझ्यांत ?

**यशवंत :** यांत उर्मटपणा कसला ? काका, आजपर्यंत एका शब्दानं मी तुमच्या मनाविरुद्ध वागलों नाहीं. पण या लग्नासंबंधीं मी तुमच्या विचाराशीं सहमत होऊं शकत नाहीं. बाबांचा शेवटचा शब्द आणि शांतीची पसंती याचा विचार मला करायलाच हवा !

**काका :** म्हणजे माझ्या मतांना धाब्यावर बसवून, तुला हें लग्न घडवून आणायचं आहे.

**यशवंत :** तसं बिलकूल नव्हे. पण माझं म्हणणं एवढचं कीं तुम्ही या लग्नाला बीनहरकत सम्मती द्यावी.

**काका :** हं ! म्हणजे आतून तुमचं सारं कांहीं ठरलंय् ?

**बापू :** गैरसमज होतो आहे काका तुमचा.

**काका :** माझा चांगला समज झाला आहे. चुलत्या पुतण्यांत वितुष्ट आणून हें घर फोडायचा तुमचा विचार आहे. पण या गाढवाला तें समजणार नाहीं. आईबापावीना हीं दोन 'पोरकीं-पोरं' मी या घरांत वाढवलीं. आज दहा वर्षें यांना लहानाची मोठीं करतांना मला काय कष्ट सहन करावे लागले, त्याची जाणीव यांना राहिलेली नाहीं. याला शिक्षण देण्यासाठीं आम्हीं अर्धपोटीं राहिलों आहोंत. यांच्या आपतकालीं जर मी धावून गेलों नसतों तर रस्त्याच्या कडेला भीक मागतांना दिसलीं असतीं हीं या वेळीं.

**यशवंत :** नेहमीं-नेहमीं तुमची ही उपकाराची भाषा ऐकण्यापेक्षां रस्त्याच्या कडेला भीक मागत फिरणं किती तरी मानाचं होतं. आम्हांला वाढवलंत-शिक्षण दिलंत पण तें कां ?-हें माझ्यापेक्षां तुम्हांलाच चांगलं ठाऊक आहे.

**काका :** यशवंत !—

**यशवंत :** हो-हो ! तुम्हांला चांगलं ठाऊक आहे माझ्यापेक्षां. तुमच्या घरांत आम्हांला आसरा मिळाला पण मायेचा हात पाठीवरून कधींच फिरला नाहीं. आमच्या भावनांचा कधीं विचार केला नाहींत कीं-सुखाच्या चार शब्दांनीं आमची विचारपूस केली नाहींत. हक्काच्या घरांत येऊन सुद्धां हीं 'पोरकीं-पोरं' शेवटीं पोरकीच राहिलीं.

**काका :** कसला एवढा पोरकेपणा जाणवला तुम्हांला ! कां ?-खायला प्यायला मिळत नाहीं ?

**यशवंत** : खाण्यापिण्याचा प्रश्न कुत्र्यालाही हातावेगळा करता येतो.

**काका** : मग यापेक्षां मी तुमच्यासाठीं आणखी काय केलं पाहिजे होतं असं तुझं म्हणणं आहे ?

**यशवंत** : आमच्यासाठीं कांहीं करायचं बाकी ठेवलं आहांत, असं मला वाटत नाहीं ! त्या पोरीला–शांतीला माझ्या गैरहजरींत–तुमच्या मनाला वाटेल तसं छळलंय तुम्ही. कां ?–आई–बापावेगळीं 'पोरकीं–पोर' म्हणून ?

**बापू** : यशवंता–शांत हो–शांत हो बाळ.

**काका** : आग भडकावायाची ती भडकावलींत, आणि आतां शांत रहण्याचा उपदेश करतां ? (उमा येऊन दारांत उभी रहाते. पाठोपाठ शांताहि येते.) यशवंत, माझ्या घरांत जर तुम्हांला सुख लाभत नसेल, तर या घराचा दरवाजा तुम्हांला मोकळा आहे.

**उमा** : काय झालं काका ?—

**काका** : काय व्हायचं ? याला घराबाहेर व्हायला सांगतों आहे !

**उमा** : आजपर्यंत एवढीं सांभाळलींत आणि आतां हांकलून देणं न्याय्य होईल का ?

**काका** : मर्यादा सोडून बोलायला तुला कुणीं सांगितलंय ?

**उमा** : मर्यादेनंच सांगतें आहें मी.

**काका** : सुनेकडून न्यायाच्या गोष्टी शिकायला माझी अक्कल गहाण पडली नाहीं. यशवंत, पुन्हा तुला शेवटची सूचना देऊन ठेवतों–याही पुढं तुला समज आली नाहीं तर घराबाहेर हांकलून देईन !

**यशवंत** : त्याची जाणीव मलाही झालेली आहे. हीं सज्ञान झालेलीं पोरं आज ना उद्यां हिस्सेदार म्हणून आपल्यासमोर उभीं रहातील; अशी धास्ती पडलीय तुम्हांला !

**काका** : सारा व्यवहार रोखठोक आहे. तुझ्या बापाचा मी कांहीं देणेदार लागत नाहीं आणि तुला बजावून ठेवतों, तुमचे थेर असेच चालणार असतील तर बखोटं धरून 'घराबाहेर' काढीन !

**यशवंत** : काका !—

**काका :** आतां अधीक कांहीं बोलशील तर उद्यांचा प्रसंग आजच येईल हें लक्षांत ठेव. तुमचा मार्ग मोकळा आहे. ( निघून जातात. )

**यशवंत :** बापू !

**बापू :** यशवंत !–उमा, यांना सांभाळण्याची जबाबदारी आतां तुझ्यावर आहे.

**उमा :** त्याची जाणीव आहे मला. पण बापू, यशवंताइतकीच मीही या घरांत पोरकीं आहें. पण कांहीं जरी झालं तरी यांना घराबाहेर जाऊं देणार नाहीं.

**बापू :** उमा, याच निर्धारानं यांचा सांभाळ कर ! ( बापू जातात. )

**यशवंत :** वहिनी !

**उमा :** होय भाऊ, तुम्हांला या घराबाहेर जाऊं देणार नाहीं.

[ शांता–उमाच्या खांद्यावर मान ठेवून–‘ वहिनी ’ असं म्हणते त्याच वेळीं शंकर येतो. ]

**शंकर :** उमा !

**उमा :** हो–हो ! यांना मी प्राण गेला तरी या घराबाहेर जाऊं देणार नाहीं–कधींहि जाऊं देणार नाहीं.

**शंकर :** उमा–! ! [ पडदा पडतो ]

## दुसरा अंक समाप्त.

# ३

[ **स्थळ :** सजावट कायम. ]

[ गोट्या घाईघाईनं येतो. ]

**गोट्या :** यशवंत ! अरे यशवंत ! कोण आहे कीं नाहीं घरांत ?

**उमा :** कोण गोट्याभाऊ, असे धापा टाकीत कुठून आलांत ?

**गोट्या :** यशवंत कुठं आहे ?

**उमा :** त्यांची प्रकृती ठीक नाहीं गेले आठ दिवस. झोंपले आहेत वाटतं खोलींत. बसा ना तुम्हीं.

**गोट्या :** बसूच म्हणतां ?—

**उमा :** बसा—बसा. ( गोट्या बसतो. ) पाणी आणूं का प्यायला ?

**गोट्या :** आतां कशाला पाणी ? माझ्या सासूरवाडच्या मंडळींनीं चांगलंच पाणी पाजलं मला.

**उमा :** मुहूर्त ठरला ना ?

**गोट्या :** कसला मुहूर्त घेऊन बसलांत वहिनी ? लग्न व्हायच्या अगोदरच बेंडबाजा वाजला.

**उमा :** म्हणजे असं झालं तरी काय ?

**गोट्या :** काय व्हायचं ? माझ्या ठरलेल्या लग्नांत आयत्यावेळीं तिच्या खाष्ट चुलत्यानं ॲटम् बॉम्ब टाकला. मुहूर्तासकट लग्नाचा बेंडबाजा वाजला. नवरी मात्र शाबूत आहे.

**उमा** : तुम्हीं कुठं जखमीं नाहीं झालांत ते ?

**गोट्या** : काळजाच्या पाकळ्यान्‌पाकळ्या छिन्नविछीन्न झाल्या आहेत.

**उमा** : आणि असं असून तुम्हीं इतपर्यंत चालत आलांत ?

**गोट्या** : थट्टा करतां वैनी ? माझ्या मनाच्या यातना—

**उमा** : सांगितल्याशिवाय कशा कळणार ?

**गोट्या** : ऐका तर ! पत्रिका छापायची म्हणून त्यांची वंशावळी आणण्यासाठीं त्यांच्याकडं गेलों. कालच त्या पोरीचा चुलता मद्रासहून आला आहे. तोही बसला होता. त्याच्याशीं माझी ओळख करून देण्यांत आली. हेच का आमच्या बेबीचे यजमान ? असं म्हणून तोंडांतला पानांचा चोथा जघळींत—बत्तीशी विचकून हंसला !

**उमा** : तुम्हांला बघून खुशीनं हंसला असेल !

**गोट्या** : तो खवीस कसला खुशींत हंसणार ? पुढं तर ऐका. तपकिरीचा बकाणा नाकांत कोंबीत त्यानं मला प्रश्नावर प्रश्न विचारायला सुरवात केली. म्हणाला तुमचं वय काय ? मी सांगितलं एकतीस.

**उमा** : पुढं ?

**गोट्या** : तेव्हां तो म्हणाला, एकतीस वर्षें होईपर्यंत तुमचं लग्न जमलं नाहीं त्याअर्थी अर्ध्या आयुष्यांत तुम्हीं कांहींच कर्तबगारी दाखवलेली नाहीं. मी म्हणालों, माझं लग्न तर होऊं दे; एका वर्षांत माझ्या कर्तबगारीचा अनुभव येईल तुम्हांला; अगदीं सोन्याचा संसार करून दाखवतों.

**उमा** : छान उत्तर दिलंत—

**गोट्या** : पण त्याला तें कुठं पटलं ? म्हणतो काय ?—तुम्हांला संधीच मिळाली नाहीं ? मी म्हटलं नाहीं ! थोडा वेळ विचारांत पडला, आणि त्याच्या त्या मिशाळ चेहऱ्याकडं पाहून माझा धीर खचला गेला.

**उमा** : कां पण ?

**गोट्या** : त्याला पाहिलंत म्हणजे तुम्हांला समजेल. पुढं म्हणतो काय,—तुमचे आई—वडील आहेत ना ? मी सांगितलं नाहीं म्हणून. भाऊ—बहीण तरी ? माझं तेंच उत्तर. तेव्हां म्हणतो काय, तुमच्या घरांत तुमच्याशिवाय कुणीच नाहीं,

तेव्हां कुटुंबांत वाढलेली आमची मुलगी एकट्या एकसुराला देतां येणार नाहीं. माझं डोकं गरगरलं. मी त्याला गर्जतच म्हणालों, माझ्या अगोदर तीं सारीजणं स्वर्गवासी झालीं त्याला माझा काय इलाज ? त्यांच्या अगोदर मी मरायला पाहिजे होतों असं तर नाहीं ना तुमचं म्हणणं ?

**उमा** : असल्यांना असंच उत्तर द्यायला हवं ! गप्प बसला ना शेवटीं ?

**गोट्या** : नाहीं हो वैनी. वाघासारखा एकदम माझ्या अंगावर गुरगुरून उठला आणि त्यानं मला निक्षून सांगितलं, हें लग्न मोडलं असं समजा. तुमच्यासारख्याला पोरगी देण्यापेक्षां वाटेवरच्या चोराला देईन.

**उमा** : तिचे वडील यावर कांहींसुद्धां बोलले नाहींत ?

**गोट्या** : कसा बोलणार ? लग्नाचा खर्च चुलताच लावणार आहे ना ? माझ्या-बाजूनं बोलणारं माझ्याबरोबर कुणींच नव्हतं. तरीपण शेवटीं उठतां उठतां धीर करून सांगितलंच; मी म्हणून तुमचं हें जडजवाहीर पत्करायला तयार झालों होतों पण हिच्याबरोबर लग्न करायचं धाडस चोरसुद्धां करूं शकणार नाहीं. तेव्हां माझ्या बखोटीला धरून तो म्हणाला, चोरानं पत्करली नाहीं तर जन्मभर लग्नाशिवाय ठेवीन पण तुझ्यासारख्या मवाल्याला देणार नाहीं. अखेर दारांत उभा राहून त्याला चार शेलक्या शिव्या मोजल्या आणि सरळ धूम ठोकली तो—

**उमा** : इकडं आलांत धांपा टाकीत ?

**गोट्या** : खरंच वहिनी, असं माझं एकाएकीं लग्न मोडलं ना ?—म्हणजे आत्म-हत्त्या करावीशी वाटते.

**उमा** : लग्न होत नाहीं म्हणून आत्महत्त्या ?

**गोट्या** : अहो, हा विचार तरी दोन दिवसांच्यावर कुठं टिकतोय ? तिसऱ्या दिवशीं लग्न करायचे विचार; उकळी फुटलेल्या पाण्याप्रमाणं उसळ्या मारूं लागतात. ज्या मुलींना मी मागणी घातली होती ना, त्यांचीं लग्न होऊन दोन दोन-तीन तीन मुलं आहेत त्यांना. पण माझ्या टाळक्याला अजून बाशिंग लागलं नाहीं. त्यांचे सुखाचे संसार बघतांना माझ्या दुःखाची मला तीव्रतेनं जाणीव होते.

**उमा** : तुमचं लग्न कां मोडतं याचा कधीं डोकं थंड ठेवून विचार केला अहांत तुम्ही ?

**गोट्या :** विचार करूनसुद्धां कारण सांपडत नाहीं वहिनी. मी काय जुगार खेळणारा आहें कीं दारू पिणारा आहे ? शरीरानं अगदीं धडधाकट–भलं थोरलं घर–आठदहा माणसं वर्षभर सुखानं बसून जेवतील एवढं धान्य येतं घरांत. शेतीवाडी आहे, नारळाची बाग आहे, आंबे–फणसाचीं झाडं आहेत. आतां तुम्हींच सांगा, कां फिसकटावं माझं लग्न ?

**उमा :** मी स्पष्टपणानं बोललों तर राग तर येणार नाहीं ?

**गोट्या :** हं बोला ना ! खुशाल बोला !

**उमा :** तुमचं अघळपघळ बोलणं आणि पोरकटपणाचं वागणं नडतंय तुम्हांला. म्हाताऱ्यापासून–पोरापर्यंत सगळ्यांशी तुम्हीं लग्नाची चर्चा करतां. कुठं काय बोलावं याचा तुम्हांला कांहीं धरबंद नाहीं. एक थट्टेचं साधन म्हणून लोक तुमचा उपयोग करतात. तुमची थट्टा करण्यांत मित्रमंडळीना समाधान वाटतं, पण तुमचं दुःख कुणाला समजत नाहीं.

**गोट्या :** खरं आहे–खरं आहे तुमचं म्हणणं.

**उमा :** खरं आहे ना ? मग आपल्या वागण्यांतबोलण्यांत आधीं सुधारणा करा.

**गोट्या :** वहिनी, इतक्या सडेतोडपणानं आणि आस्थेनं माझे दोष कुणींच सांगितले नव्हते मला ! माझ्या डोक्यांत अगदीं लख्ख प्रकाश पडला !

**उमा :** तोंडापुरतं मी बोलत नाहीं आणि दुसऱ्यानं बोललेलं मला आवडतही नाहीं.

**गोट्या :** नाहीं–नाहीं. मी नुसतं तुमच्या समाधानासाठीं बोलत नाहीं. पटलं म्हणूनच बोलतों आहें.

**उमा :** मग आघळपघळ बोलण सोडा–पोरकटपणा टाका आणि सरळपणानं–शहाणपणानं वागायला सुरुवात करा. तुमची थट्टा करणारीं माणसंच तुमचे गूण गाऊं लागतील, समजलं का ? मग तुमच्या लग्नाचा पुढाकार मी घेईन.

**गोट्या :** वहिनी, वहिनी बोललांत तेवढं पुरे मला. आतां पुढाकार घ्या किंवा घेऊं नका पण आज तुम्हीं माझ्या डोळ्यांत झणझणीत अंजन घातलंत. मला आज नवी दृष्टी आली, गोट्याचा पुनर्जन्म झाला. लग्नाची मला जरुरी नाहीं. माझ्या कर्तबगारीनं मी सर्वांना दिपवून टाकणार.

**उमा :** भाऊ, ज्याला वडीलधारं माणूस वळण लावायला नसतं त्याचं कर्तबगार जीवन केव्हां केव्हां मातीमोल होतं.

**गोट्या** : ठरलं वहिनी. या पुढं तुमच्या वागण्यांप्रमाणं वागायचं ठरलं.

( यशवंत येतो. )

**यशवंत** : कायरे गोट्या, लग्न ठरलं का ?

**गोट्या** : ( एकदम उठून ) माझं लग्न मोडलं ! पण नवजीवन लाभलं. आजचा गोट्या मेला. उद्यांचा गोट्या माणूस म्हणून जगणार. यशवंता, तुम्हां मित्रांना माझा कोंपरापासून नमस्कार.

[ गोट्या एकदम निघून जातो. यशवंत आश्चर्यानं पहातच रहातो. ]

**यशवंत** : गोट्या काय असा पिसाटासारखा बोलून गेला ?

**उमा** : त्याचं चित्र त्यांच्यापुढं उभं केलं आज. तेव्हां वाह्यातपणा आणि पोरकटपणा सोडण्याची प्रतिज्ञा करून गेले आहेत ते.

**यशवंत** : हं ! ( विचारमग्नावस्थेंतच बसतो. )

**उमा** : भाऊ !

**यशवंत** : अं ? तूं हांक मारलीस मला ?

**उमा** : तुम्हीं हें काय चालवलं अहांत ?

**यशवंत** : तुला सर्व ठाऊक आहे वहिनी.

**उमा** : त्याबद्दल नाहीं म्हणत मी. आज आठ दिवस तुम्हांला ताप येतोय, डॉक्टरकडं जाऊन औषध घ्यायला सांगितलं पण तुम्हीं कांहीं लक्ष देत नाहीं.

**यशवंत** : तसा कांहीं फारसा ताप नाहीं. जाईल आज उद्यां.

**उमा** : भाऊ, तुम्हींच जर असं मनाला लावून घेतलंत तर शांतेवर किती परिणाम होईल याचा विचार केला अहांत का तुम्हीं ? तिचंसुद्धां जेवणाकडं धड लक्ष लागत नाहीं.

**यशवंत** : वहिनी, मी पुष्कळ स्वतःला समजावण्याचा प्रयत्न करतोय् पण कांहीं केल्या जमत नाहीं. जों जों अधिक विचार करतों तों तों मनाच्या यातना मात्र अधीक वाढतात. वाटतं तोंड घेऊन कुठं तरी निघून जावं !

**उमा** : जा खुशाल जा ! ! कुणाच्या मायेचे पाश तुम्हांला आडवणार आहेत ? तुम्हांला वाटेल तसे वागा तुम्हीं. वहिनी तुम्हांला सांगायला येणार नाहीं.

**यशवंत** : वहिनी—

**उमा** : मेली तुमची वहिनी ! तिच्या नांवाचा उच्चारही करूं नका !! तुम्हीं स्वतंत्र आहांत–वाटेल तसं वागण्याचा तुम्हांला अधिकार आहे.

**यशवंत** : तूंही रागावलीस वहिनी माझ्यावर ?

**उमा** : मी रागावलें आहे पण तें तुमच्यावर नव्हे. मी स्वतःवर रागावलें आहें. दुसऱ्या कुणांवर रागवण्याचा मला काय अधिकार आहे ?

**यशवंत** : कां ? माझ्यावर रागवण्याचा तुला अधिकार नाहीं ?

**उमा** : मी थोडीच तुमची सख्खी वहिनी आहे ?

**यशवंत** : वहिनी–तूं नुसती वहिनीच नव्हें 'आई' आहेस माझी. आणि म्हणूनच माझ्यावर रागावण्याचा–शंभर वेळां रागावण्याचा तुझा अधिकार आहे.

**उमा** : समजलं मला सारं !

**यशवंत** : वहिनी, परक्यासारखी बोलूं नकोस.

**उमा** : मुळांतच जिथं परकेपणा आहे तिथं आपलेपणा निर्माण होणार कसा ? आपलेपणा निर्माण व्हायला माणसांनीं एकमेकांच्या जवळ यायचं असतं, एक जीव व्हायचं असतं पण इथं सारा निराळाच प्रकार. एकजीव होण्याऐवजीं एक-मेकांना जीव घेण्यापर्यंत मजल. कुणी कुणाची समजूत काढावी.

**यशवंत** : वहिनी !

**उमा** : मी तरी काय करूं ? स्वतः जिथं परावलंबी तिथं दुसऱ्याला काय आश्रय देणार ?

**यशवंत** : तुझ्या मायेचा आश्रय मला पृथ्वीच्या मोलाचा आहे, आणि म्हणूनच आजपर्यंत या घराचा उंबरटा मी ओलांडू शकलों नाहीं. नुसत्या रहाण्याच्या–अगर खाण्यापिण्याच्या आश्रयाचा प्रश्न असता तर पृथ्वीच्या पाठीवर तो मी कुठंही शोधून काढला असता. पण मी मरत होतों घराण्याच्या इभ्रतीसाठीं–जपत होतों नांवलौकिसाठीं ! ! आणि सारं कांहीं सहन करीत होतों तुझ्यासाठीं–फक्त तुझ्यासाठीं–माझ्या वहिनीसाठीं ! ! !

**उमा** : भाऊ !

**यशवंत** : हो ! तुझ्यासाठीं ! खरं सांगूं वहिनी—

**उमा** : काय ?

**यशवंत :** घराण्याच्या इभ्रतीसाठीं–नांवलौकिकासाठीं जरी मी सारं सहन करण्याचा प्रयत्न करीत होतों तरीही कधीं–कधीं माझ्या मनाचा तोल सुटत असे. इभ्रत–नांवलौकिक सारं कांहीं झूट आहे असं वाटे. असल्या खोट्या कल्पनांचा विचार करीत बसण्यापेक्षां या तुरुंगाबाहेर पडावं आणि शांतासह कुठं तरी दूर–दूर निघून जावं ! परागंदा व्हावं ! ! असे विचार मनांत घोळत असत माझ्या ! पण नेमकी त्याच वेळीं माझ्या वहिनीची करुण मूर्ती माझ्या डोळ्यां-समोर उभी रहात असे आणि सारे विचार मनांतल्या मनांतच विरून जात असत. दुःख–अपमानाचा विसर पडे !

**उमा :** ( सद्‌गदित होऊन ) भाऊऽ !

**यशवंत :** आईच्या मायेनं आमच्या आवडीनिवडी पुरवल्या आहेस तूं. कशाची–कशाची कमतरता पडूं दिली नाहींस ! तुझ्या अत्यंतिक लोभामुळंच सारं कांहीं विसरून जात होतों मी.

**उमा :** आणि तुम्हीं दोन भावंडं होतां म्हणूनच वहिनी आपली दुःखं विसरत होती. नाहींतर या तुरुंगांतल्या सक्तमजुरीच्या यातना असह्य होऊन, वहिनीनं जगाचा केव्हांच निरोप घेतला असता.

**यशवंत :** वहिनी !

**उमा :** भाऊ, तुम्हां दोघां भावंडांच्या गोड सहवासाच्या ओढीमुळें, यापूर्वी जें झालं नाहीं तें मात्र आतां लौकरच होणार आहे.

**यशवंत :** भलतंसलतं बोलूं नकोस वहिनी.

**उमा :** मग मी सांगतें तेवढी गोष्ट कराल माझ्यासाठीं ?

**यशवंत :** काय ?

**उमा :** वहिनी जगावी असं जर वाटत असेल, तर आधीं डॉक्टरकडं जाऊन औषध घ्या !

**यशवंत :** बरं !

**उमा :** एवढ्यावरच नाहीं भागायचं. झाल्यागेल्या गोष्टी विसरून हंसऱ्या तोंडानं वावरायला लागा.

**यशवंत :** बरं ! बरं ! तुझ्या म्हणण्याप्रमाणं वागायचा प्रयत्न करतों हं ! औषधाची बाटली घेऊन येतों मी.

[ आंत जातो. उमा आपल्याच विचारांत मग्न होते. यशवंत बाटली घेऊन येतो. ]

**उमा** : लवकर या हं !

**यशवंत** : औषध घेऊन तसाच येतों.

[ जातो. उमा स्वतःशींच गाणें गुणगुणुं लागते. ]

[ राग किरवाणी; ताल केरवा. ]

सुखदस्मृतिचा तो मंगल क्षण,
आठवतो कधीं–कधीं
सजवीन सदना म्हणूनीं पाऊल
टाकियलें मी या दारीं
जन म्हणती मज भाग्यलक्ष्मी
परवशता परी कां पदरी ॥ १ ॥

[ गाणं संपल्यावर मोतीराम येतो. ]

**मोतीराम** : वहिनी !

**उमा** : या मोतीरामभाऊ, बसा.

**मोतीराम** : यशवंत कुठं आहे ? आजारी आहे ना तो ?

**उमा** : आठ दिवसांनंतर बघायला आलां आहांत काय ?

**मोतीराम** : खरं म्हणाल तर आजसुद्धां येणार नव्हतों मी. या घरांत न येण्याचीच प्रतिज्ञा केली होती. पण मी उद्यां मुंबईला जाणार आणि यशवंत आजारी असल्याचं समजलं म्हणून यावंच लागलं.

**उमा** : थोड्या वेळांपूर्वी डॉक्टरकडं पाठवलंय त्यांना. आठ दिवसांत धडपणें जेवलेसुद्धां नाहींत. सारखे आपल्या विचारांत असतात.

**मोतीराम** : कोणी कुणाला समजावून सांगायचं ? प्रत्येकाची मनःस्थिति नाजूक झाली आहे.

**उमा** : सर्वांत कोंडमारा होतो तो मात्र माझा.

**मोतीराम** : म्हणजे ?

**उमा** : घरांतल्या भांडणांना तोंड द्यायचं, शांताची–यशवंतभाऊंची समजूत घालायची आणि आपलं सांत्वन आपणच करायचं !

**मोतीराम :** माझ्या इथं येण्याजाण्यामुळं तुम्हीं जरी बोललां नाहींत, तरी तुम्हांलाही त्रास झालेला आहे. इथं येऊन नसतीं भांडणं वाढविण्यापेक्षां न आलेलंच बरं, नाहीं का ? केवळ तुमच्यासाठीं आणि यशवंतासाठीं, झाला अपमान गिळून निर्लज्जाप्रमाणं इथं आलों आहें मी आज !

**उमा :** शांतेचं नांव कां वगळलंत ?

**मोतीराम :** कदाचित् तिच्या माझ्या नांवाचा मेळ आयुष्यांतही बसणार नाहीं म्हणून.

**उमा :** असं भलतं सलतं बोलूं नका भाऊ ! हें शांतेच्या कानावर गेलं तर फार वाईट वाटेल तिला.

**मोतीराम :** माझंच मन ठिकाणावर नाहीं. मग दुसऱ्यांच्या दुःखाचा विचार करून मी माझं दुःख तरी कशाला वाढवूं ?

**उमा :** केव्हां केव्हां आपल्या दुःखापेक्षां दुसऱ्यांच्या दुःखाचा भार वाहाण्यांत अधिक आनंद असतो. तुमच्या असल्या बोलण्यानं शांताला किती दुःख होईल ठाऊक आहे ? त्या पोरीच्या मनाची कल्पना नाहीं तुम्हांला.

**मोतीराम :** चांगली कल्पना आहे मला. पण वहिनी, कल्पना बऱ्याच वेळां कल्पनेंतच विरतात. तुम्हीं थोड्या का तळमळतां, थोड्या का त्रास सहन करतां आमच्यासाठीं ?

**उमा :** भाऊ, 'सोशीकपणा' हा 'गूण' आहे आणि तो स्त्रियांच्या ठिकाणीं असावाच लागतो. कारण, त्यामुळं त्यांच्या चारित्र्याला उजाळा येतो.

**मोतीराम :** सोशीकपणाच्या नांवाखालीं आपलं व्यक्तिमत्व मारणं न्याय्य आहे का ?

**उमा :** व्यक्तिमत्वाचं फाजील स्तोम माजवून दुसऱ्यांचीं मनं दुखविण्यापेक्षां आपला मोठेपणा विसरून दुःखांतच सुख मानून जगणं, हें समाधान कमी आहे ?

**मोतीराम :** खोटं समाधान मानून सुखी असल्याचा देखावा फक्त तुम्हीच करूं शकतां. मला तें जमायचं नाहीं. बरं जातों मी.

**उमा :** आलांत काय आणि चाललांत काय ?

**मोतीराम :** यशवंताला भेटायचं होतं. तो डॉक्टरकडं गेलाय म्हणतां. बाहेरच भेटतों त्याला.

**उमा :** शांताला भेटणार नाहीं ?

**मोतीराम :** झाला प्रकार लक्षांत घेऊन न भेटलेलंच बरं नाहीं का ?

**उमा :** तें जरी खरं असलं, तरी उद्यां मुंबईला जाणार आहांत तुम्हीं. तिला भेटून चला. स्त्रियांच्या मनाची कल्पना पुरुषांना कधींच येणार नाहीं. विहिरीवर आहे ती, पाठवून देतें हं मी तिला.

[उमा बाहेर जाते. मोतीराम शून्य अंतःकरणानं गाणं गुणगुणतो.]

[राग : भैरवी. ताल : त्रिताल]

मनांत माझ्या अनंत काहूर
स्वप्न भंगतां लागे हुरहुर
जिवन दौलत तुला मानीलें,
रंगुनी रचिलें उंच मनोरे,
जाऊं कैसा मी त्यजूनी दूर ? ।। १ ।।

[गाणं संपतं. मोतीराम खुर्चीवर बसतो. शांता येते.]

**मोतीराम :** वहिनी कुठं आहे ?

**शांता :** विहिरीवर.

**मोतीराम :** उद्यां मुंबईला जाणार मी. [शांता कांहींच बोलत नाहीं.] कां ?–बोलत कां नाहींस ?

**शांता :** काय बोलूं आणि कशाबद्दल बोलूं ?

**मोतीराम :** माझ्यावर रागवली आहेस तूं ?

**शांता :** कुणावरही रागावण्याचा मला अधिकार नाहीं.

**मोतीराम :** माझ्यावरसुद्धां ?

**शांता :** कोणत्या हक्कानं तुमच्यावर रागावूं ? रागावण्याचा अधिकार प्राप्त होण्याआधींच तो नाहींसा झालाय !

**मोतीराम:** शांता !

**शांता :** खोटं बोलतें का मी कांहीं ?

**मोतीराम :** खरं आहे तुझं म्हणणं ! गेले आठ दिवस मी याच विचारांत घालवले. आई आपल्या परिनं विचार करते आहे, बापू ते तर अगदीं

धीरगंभीरपणानं वागताहेत. पण काळजीनं खंगलेला चेहरा, त्यांचं अंतरंग स्पष्टपणानं सांगत आहे.

**शांता** : तुम्हीं आपल्या दुःखाबद्दल बोलतां, मग माझ्या मनाची काय स्थिति होत असेल ? यशवंतदादा तर वेड्यासारखा वागायला लागलाय. धडपणें जेवण-सुद्धां नाहीं. आज आठ दिवस ताप येतोय त्याला.

**मोतीराम** : मला समजलं होतं पण पुन्हा आपला अपमान करून घ्यायला या घरांत पाऊल टाकायला मन तयार होत नव्हतं.

**शांता** : तुमचा अपमान होऊं नये म्हणून तुम्हीं आमच्याकडं पाठ फिरवलीत. मग दहा वर्षें आम्हीं या घरांत कशीं काढलीं ? कोणतं स्वातंत्र्य होतं आम्हांला ? गुरासारखं राबायचं आणि दोन वेळां जेवायचं !

**मोतीराम** : मला कल्पना आहे.

**शांता** : फक्त कल्पना ! बिचाऱ्या वहिनीचा काय तो आधार. पण तिचीही तीच गत. दादाला वाईट वाटूं नये म्हणून माझा ‘ छळ ’ मी त्याच्या कानापर्यंत पोंहचूं दिला नाहीं इतके दिवस.

**मोतीराम** : त्या छळांतून सुटण्याचा मार्ग होता, पण त्या मार्गावर काकांनीं आपल्या विरोधाचे कांटे पसरून ठेवले आहेत.

**शांता** : त्याच कांट्यानीं रक्तबंबाळ होऊन जगणं, हेंच आहे माझ्या नशिबीं. जा—तुम्ही खुशाल मुंबईला जा ! मी तुमच्या आयुष्यांत आलेंच नाहीं असं समजा— शांताला विसरून जा !

**मोतीराम** : तुला विसरून जाऊं ? सांग, शांता कसं शक्य आहे तें ?

**शांता** : हो, तुम्हांला मला विसरावंच लागेल. आजपर्यंत कुठलं सुख लाभलंय मला ?— मग आयुष्यभर तुमची जोड मिळेल ही वेडी आशा तरी कशाला धरूं मी ?

**मोतीराम** : शांता, तुला विसरण्याइतकं उथळ प्रेम मी केलेलं नाहीं. लहानपणा-पासून जोपासलेलं, वयाच्या वाढीबरोबर वाढलेलं, आपलं निर्मल प्रेम विसरतां येणं कधींतरी शक्य आहे का ? कुणाचा कितीही विरोध असला, तरी तें नष्ट होणार नाहीं. उलट अग्नीदिव्यांतून निघणाऱ्या सोन्याप्रमाणं उजळून निघेल.

**शांता** : हें समाधानसुद्धां आपल्याला एखादे वेळीं घातक ठरायचं ?

**मोतीराम :** मोतीरामबद्दल तुला विश्वास आहे ना? आपलं प्रेम सगळ्या संकटांना टक्कर देईल. विरोधकांचे विरोध हाणून पाडील. आयुष्यांतली भाग्यवेळा जवळ येईल.

**शांता :** नयनांची निरांजनं पेटवून त्या प्रकाशांत त्या दिवसाची वाट पाहीन मी! दादा डॉक्टरकडं गेलाय त्याला तिकडं जाऊन भेटा. काका–शंकर-दादा मळ्यावर गेले आहेत; इतक्यांत यायचे आणि–तुम्हीं मुंबईला जातांना माझ्यामुळं भांडणतंटे व्हायला नकोत.

**मोतीराम :** आणि भांडणतंटे झालेच तर सारं दुःख सहन करशील ना तूं? या मोतीरामला विसरणार तर नाहींस ना?

**शांता :** कोणत्याही संकटांत, शांता तुम्हांला विसरणं शक्य नाहीं.

**मोतीराम :** मग तुझे डोळे डबडबलेले कां?

**शांता :** हे अश्रू–हे अश्रू दुःखाचे नाहींत–आपल्या वियोगाचे आहेत! जा तुम्हीं! यापुढं रडणार नाहीं मी. तुमच्या आशेच्या आधारावर हंसतमुखानं सारं दुःख सहन करीन मी.

**मोतीराम :** जातों तर–

[ जायला निघतो इतक्यांत बाहेर दरवाजांत शंकर उभा असतो. ]

**शंकर :** मला पाहिल्याबरोबर चोरासारखा निघालास?

**मोतीराम :** चोराला जगांत सगळेच चोर आहेत असं वाटतं. राजरोसपणें आलोंय् आणि उजळ माथ्यानं जात आहे. चल–हो बाजूला.

[ शंकर चमकून बाजूला होतो. मोतीराम जातो. ]

**शंकर :** राम निघून गेला, सीता कशाला उभी राहिली?

**शांता :** घराण्याची परंपरा सांभाळण्यासाठीं.

**शंकर :** घराण्याच्या परंपरेचे केव्हांच तीन तेरा वाजले. घराबाहेर पडून लोक काय बोलतात तें कानाचे पडदे फोडून ऐक जा!

**शांता :** काय बोलतात लोक?

**शंकर :** आपोआप समजेल तुला.

**शांता :** तुझ्याच तोंडून ऐकायची इच्छा आहे माझी.

**शंकर :** त्या दिवशीं झालेल्या भांडणामुळं लोकांचे तर्क नाना तऱ्हेनं चालले आहेत. लोक म्हणतात कीं इथं कांहीं तरी पाणी मुरतंय् म्हणून.

**शांता** : आपल्या बहिणीसंबंधीं असली भाषा बोलायला लाज नाहीं वाटत तुला?

**शंकर** : सख्खी बहीण असतीस तर लोकांचं असं कांहीं बोलणं ऐकण्या-अगोदरच उभी चीरून टाकली असती.

**शांता** : तो कत्तलखाना उघडण्याअगोदर तुमच्या अब्रूला तडे जाण्यासारखं माझ्याकडून काय घडलंय् तें सांग ना.

**शंकर** : दिवे लावायचे ते लावलेस आणि उलट तोंड करून मलाच विचारतेस ? गांवांत उठलेली बोंब मी तुला सांगितली, माझ्या पदरचं नाहीं सांगितलं !

**शांता** : लोक बिचारे कशाला उगीचच बोलतील ? तुम्हींच नात्यागोत्यांतल्या माणसांजवळ माझ्याबद्दल मनाला येईल तें सांगत सुटलां आहांत.

**शंकर** : उलट शब्दानं माझी संभावना करशील तर थोबाड रंगवून टाकीन.

**शांता** : तेवढी रग जर तुझ्या हाताला आली असेल तर मार पाहूं माझ्या थोबाडांत, तुझा पराक्रम पाहूं दे मला. ( यशवंत येतो. )

**शंकर** : असं ? एवढा उर्मटपणा ?–तर मग—

[ मारायला पुढं जातो इतक्यांत यशवंत पुढं येतो. ]

**यशवंत** : दादा–तिच्या थोबाडींत बसण्यापूर्वी तुझा तो हात मुळासकट उखडून टाकीन.

**शांता** : दादा–( शांता यशवंतला मिठी मारते. )

**यशवंत** : हिच्या थोबाडांत मारण्यापर्यंत एवढा कोणता मोठा अपराध केला होता तिनं तुझा ?

**शंकर** : तुझ्या या निर्लज्ज बहिणीलाच विचार.

**यशवंत** : तुझ्यासारख्या बेशरम माणसाच्या तोंडूनच तें ऐकायचंय मला !

**शंकर** : यशवंत !–( उमा येते. )

**यशवंत** : दादा—

**उमा** : काय झालं भाऊ.

**यशवंत** : शांताच्या थोबाडींत मारण्यापर्यंत आज याची मजल गेली. तिच्या अंगावर हात टाकायला जातांना ती काय पांच वर्षांची परकरी पोर वाटली तुला ? ( उमाला संबोधून ) मोतीराम मला वाटेंत भेटला. तो इथून जातांना याचा–त्याचा खटका उडाला. तूं विहिरीवर कुठं तरी कामांत गुंतली होतीस आणि शांता घरांत होती असं त्यानं मला सांगितलं मात्र, मी त्याच्याशीं धडपणानं

बोललों सुद्धां नाहीं. तसाच धांवत आलों, कारण मला खात्री होती–हा शांताला त्रास दिल्याशिवाय राहाणार नाहीं; आणि धांवत येऊन शेवटीं नेमकं तेंच पाहिलं इथं ! मी वेळेवर आलों नसतों तर—

**शंकर** : बत्तीशीच हालवून टाकणार होतों तिची.

**यशवंत** : मलाहि मग त्याच मार्गाचा अवलंब करावा लागला असता.

**उमा** : भाऊ !

**शंकर** : भाऊच्या कळवळयानं तूं एवढी धांवून आली आहेस पण बाहेर लोक तोंडांत शेण टाकताहेत त्याची जाणीव आहे तुला ?

**उमा** : आमच्या घरच्या भानगडींत पडायचं लोकांना काय कारण ?

**शंकर** : तुमच्या घरची अब्रू चव्हाट्यावर गेली म्हणून.

**यशवंत** : पण ती चव्हाट्यावर नेणारे तुम्हींच ना ?

**उमा** : भाऊ, माझं ऐका. तुम्हीं शांत व्हा पाहूं !

**यशवंत** : पण वहिनी !—

**उमा** : तुम्हीं शांत व्हा म्हणून सांगितलं ना !

**शंकर** : लाडक्या दीराला तिची प्रेमळ वहिनी शांत रहाण्याचा उपदेश करते आहे ना ? मग त्याला शांत रहाणंच भाग आहे. मी बायकोचे फाजील लाड पुरवणारा नाहीं ना ? तेव्हां पतिप्रेमाचा पूर दीराच्या बाजूनं वाहायला लागलाय् !

**यशवंत** : दादा !

**उमा** : माणूस आहांत कीं सैतान ?

**शंकर** : इज्जतदार माणूस आहें मी. पण तुम्हीं, तुमच्या प्रीतीला बहर येण्यासाठीं, शांताच्या प्रेमाला खतपाणी घातलंत तुम्हीं.

**यशवंत** : बेशरम (शर्ट धरतो) आईसारख्या माझ्या वहिनीबद्दल असले हलकट शब्द उच्चारणाऱ्या नालायक माणसाचा खून करायला मी मागंपुढं पहाणार नाहीं.

[ उमा घाबरते. एकदम पुढं होऊन त्यांना बाजूला करण्याचा प्रयत्न करते. ]

**उमा** : बाजूला व्हा. बाजूला व्हा अगोदर. भाऊ ! बाजूला व्हा आधीं. माझी शपथ आहे तुम्हांला ! ( यशवंत बाजूला होतो. ) या घरांत एकमेकांचे खून पाडून वाडवडलांच्या पुण्याईनं वसलेल्या या घराचा चौथरा तर तुम्हांला उजाड करायचा नाहीं ना ?

**यशवंत** : आईबहिणीच्या पवित्र-प्रेमानं, जिनं आम्हांला या घरांत वाढवलं तिच्याबद्दल-आपल्या सुशील पत्नीबद्दल असले हीन उद्‌गार काढतांना शरम वाटायला पाहिजे होती तुला. शंकरानं हलाहल पचवलं पण हा शंकर सत्प्रवृत्ती मारणारं वीष ओकला.

**शंकर** : असं काय ?–पण झालं हें कांहींच नाहीं. आमच्याच घरांत आमच्या विरुद्ध चाललेल्या कटाचीं पाळंमुळं उखडून टाकीन, नाहींतर शेवटीं हें घर पेटवून राखरांगोळी करीन त्याची ! पण तुम्हांला सुखानं जगायला देणार नाहीं.

(काका येतात.)

**काका** : काय झालं रे शंकर ?

**शंकर** : काय व्हायचं शिल्लक राहिलंय् ? हा येशा माझ्या अंगावर धांवून आला आज. माझा खून करणार होता.

**काका** : यशवंत !—

**यशवंत** : होय ! वहिनी मध्यें आली नसती तर माझ्या हातून खूनही झाला असता. पण कां ?–त्याचं कारण याला विचारा !

**काका** : म्हणजे हा प्रकार आहे तरी काय ?

**शंकर** : मी बाहेरून आलों तेव्हां मोतीराम इथं आला होता. उमा घरांत नव्हती कीं यशवंताही नव्हता. मी आल्याबरोबर चोरासारखा निघून गेला. त्या-बद्दल सहज विचारलं मी शांतीला, तर एकदम ती मला अपशब्द बोलली आणि तिचा कैवार घेऊन हीं दोघंजणं माझ्यावर तुटून पडलीं !

**काका** : उमासुद्धां ?

**शंकर** : यांना पाठीशीं घालून त्यांच्या बाजूनं भांडण्याचं वकीलपत्र घेतलं आहे ना हिनं !

**काका** : उमा खरं हें ?

**उमा** : माझ्यापेक्षां यांच्या शब्दावर तुमचा लवकर विश्वास बसेल.

[एकदम घरांत निघून जाते. पाठोपाठ शांताही जाते.]

**काका** : ठीक ! यशवंत, शंकरच्या अंगावर हात टाकण्यापर्यंत तुझी मजल गेली काय ?

**यशवंत** : आजपर्यंत एका शब्दानंही मी याला दुखवल्याचं आठवत नाहीं. पण आज शांतेच्या थोबाडांत मारायला गेला होता हा !

**काका** : तिचा अपराधच आहे तसा. भावाच्या नात्यानं तो तिला रीतभात शिकवणारच.

**यशवंत** : तिला मारायला धांवण्यांत 'रीतभात' आहे असं सांगण्यापूर्वी तुम्हीं कांहीं विचार केला आहांत का ?

**काका** : मला विचार करायला सांगण्यांपूर्वी याचा परिणाम काय होईल हा प्रश्न तूं सोडवला आहेस काय ?

**यशवंत** : आश्रीतांना सुळीं द्यायचं कीं माफी करायची हें मालकाच्या मर्जीवर अवलंबून आहे.

**शंकर** : माझं म्हणणं कदाचित् तुम्हाला खोटं वाटलं असेल पण तुम्हांला सुद्धां हा उर्मटपणानं उत्तर द्यायला लागला.

**काका** : पण मी तीं निमुटपणानं सहन करणारा नाहीं. तुमच्यासाठीं आजपर्यंत जें केलं त्याचा विसर पडलाय् तुला !

**यशवंत** : त्याची आठवण झाली म्हणजे सहनशिलतेचे बंध तटातट तुटूं लागतात. प्रयासानं दाबून ठेवलेलं दुःख उसळ्या मारून बाहेर पडतं !

**काका** : तुम्हांला वाढवण्यांसाठीं आईबाप उपसणार नाहींत एवढ्या खस्ता आम्हीं उपसल्या. डोळयांत तेल घालून तुमच्या सुखासाठीं जपलों त्याची फेड अशा तऱ्हेनं करतोस काय ?

**यशवंत** : हा जो मायेचा देखावा तुम्हीं उभा केला होता तो कशासाठीं ? माझ्या बापाची कष्टार्जित मिळकत सहजासहजीं पचनीं पडावी म्हणून मायाममतेचं नुसतं नाटक चाललं होतं तें !

**काका** : पैशासाठीं केलं मी सारं ?

**यशवंत** : मग कशासाठीं ?—

**काका** : यशवंता, तोंड आंवरून बोल !

**यशवंत** : आजपर्यंत तोंड मिटून गप्प बसलों म्हणूनच साऱ्या हालअपेष्टा सहन कराव्या लागल्या मला. माझ्या वडिलांचे एवढे पैसे तुमच्याजवळ शिल्लक असतांना शाळेच्या फीसाठीं चार चार दिवस गैरहजर रहावं लागे मला.

**काका** : तरी पण मॅट्रिकपर्यंत शिक्षण झालंच ना ? धर्मादाय खात्यावर तर शिकला नाहींस ना ?—

**यशवंत** : नाहीं तर काय ? कधीं सरळपणानं वरच्या वर्गाचीं पुस्तकं घेऊन दिलीं नाहींत. दुसऱ्यांच्या पुस्तकांवरून बहुतेक अभ्यास केलाय् मी !

**शंकर** : जेवणही मिळत नव्हतं म्हणून बोल ना !

**यशवंत** : दारीं आलेल्या भिकाऱ्यालाही अन्न मिळतं मग मी तर घरांतला माणूस होतों. पुतण्याला शिक्षण देतोय् असं मारे दिमाखानं लोकांना सांगत होतां, पण त्याचवेळीं मला एकसारखी टोंचणी चालू होती, ' बस्स झालं शिक्षण. कुठं तरी नोकरी कर आणि माझा भार कमी कर !' मला आतां तुम्हांला पोसण्याची ताकद राहिली नाहीं. रात्रीच्या रात्रीं रडून काढल्या आहेत मी.

**काका** : पंख फुटल्यावर भाषा बदलली तुझी.

**यशवंत** : भाषा बदलली नाहीं. दुःखाला घातलेला बांधारा फुटला म्हणूनच तोंडावाटे आपोआप शब्द बाहेर पडताहेत.

**काका** : एवढे जर तुमचे हाल होत होते तर यापूर्वींच ' घराबाहेर ' कां पडलां नाहींत.

**यशवंत** : कां म्हणून बाहेर पडणार? त्यावेळीं जरी मी अज्ञान होतों तरी आमच्या वडिलांनीं आपली सारी कमाई तुमच्या हवाली केली हें समजण्याइतकं ज्ञान त्या वेळींही मला होतंच !

**काका** : अस्सं ? म्हणजे बापानं ठेवलेल्या ठेवीचा हिशेब हवाय् तुला ?

**यशवंत** : आजपर्यंत त्याची गरज मला भासली नव्हती आणि या क्षणालाही नाहीं. पण तुम्हीं जो कांगावा करतां आहांत कीं, तुमच्या बापानं कांहीं मोठी ठेव ठेवली नव्हती. त्यासाठीं हें बोलावं लागलं. पंचवीस हजार म्हणजे थोडी–थोडकी रक्कम नाहीं. बाबांच्या आयुष्याची कमाई होती ती ! त्यांचीं पोरं सुखानं जगलीं असतीं तीवर !

**काका** : एवढी रक्कम तुझ्या बापानं माझ्या हवाली केली याचा तुझ्याजवळ कांहीं पुरावा आहे का ?

**यशवंत** : पुरावा ? त्यांची रेल्वेची नोकरी सुटतांना मिळालेला फंड आणि जवळची रोकड; मिळून पंचवीस हजार रुपये तुमच्या हातीं दिल्याचं त्यांच्या नोंदवहींत नमूद आहे आणि ती नोंदवही आज माझ्याजवळ आहे.

**काका** : ( गांगरून ) असतील कदाचित् !

**यशवंत :** असतील कदाचित नव्हे दिले होते असं म्हणा. इतके गांगरून जाऊं नका !

**काका :** मला गांगरण्याचं कांहींच कारण नाहीं. तुमच्या बापाच्या आजारीपणानं, तुमच्या देण्यादुखण्यांत शिक्षणासाठीं सारे पैसे संपून गेले. तुझ्याकडं तुझ्या बापाच्या ठेवीची नोंदवही आहे, आणि खर्चाच्या रोख-ठोक हिशोबाची नोंद माझ्याजवळ नाहीं असं समजतोस कीं काय ?

**यशवंत :** ज्याला एवढी रक्कम पचवायची आहे तो बनावट खर्चाचे तक्ते तयार करून ठेवणारच ! आणि तुमच्यासारखा कारस्थानीं माणूस तर मुद्दलापेक्षां जास्त खर्च झालेला दाखवील !

**काका :** हीं सर्पाचीं पोरं आज ना उद्यां विपाचं गरळ ओकणार याची जाणीव ठेवून, तारीखवार ठेवलेला हिशेबाचा तक्ता तुझ्या तोंडावर फेंकतों

[ जायला निघतो. ]

**यशवंत :** थांबा ! तुमच्या हिशेबाचा-हिशेब घेण्यासाठीं मी हें बोललों नाहीं, तुमच्या कावेबाजपणा उघड केला आहे.

**काका :** म्हणजे तुमच्यासाठीं त्या पैशांचा उपयोग झाला नाहीं असं म्हणायचंय् तुला ?

**यशवंत :** अलबत ! ते पैसे आमच्यासाठीं खर्च झालेले नसून जागाजमिनी घेण्यासाठीं-इस्टेटवाडी आणि हा डामडौल वाढविण्यासाठीं खर्च झाले आहेत.

**शंकर :** तुझ्या बापाच्या पैशांतून जागाजमीन घ्यायला आम्हीं काय भीक मागत होतों गांवांत ?

**यशवंत :** दादासाहेब, सारी खरेदी माझ्या वडिलांच्या मरणानंतरची आहे.

**काका :** सारी इष्टेट निढळाच्या घामानं मिळवलेली आहे.

**यशवंत :** घाम गाळूनसुद्धां तेव्हां पोटभर मिळायची पंचाईत होती. 'आमचे पोटापाण्याचे हाल होताहेत-कसंही करून पैसे पाठव' अशीं प्रत्येक महिन्याच्या-महिन्याला जाणारीं तुमचीं पत्रं पुराव्यादाखल माझ्याजवळ आहेत.

**काका :** पत्र पाठवलीं असतील पण तुझ्या बापानं एक तनसडीही पाठविली नाहीं कधीं.

**यशवंत :** पैसे पोहोंचल्याच्या मनिऑर्डरच्या पावत्या जशाच्या तशा शाबूत आहेत काका !

**काका :** तसे थोडेफार कधीं पाठवले असतील !

**यशवंत :** म्हणजे तुमच्याजवळ शिल्लकबाकी पूज्य होती ? बाबा मदत करायचे एवढं तरी सिद्ध होतं ना ?

**काका :** हे सारे पुरावे सादर करून तुला कोर्ट-कचेऱ्या करायच्या आहेत असंच ना ?

**शंकर :** हें सगळं त्या बापूचं कारस्थान आहे. ( बापू येतात. )

**काका :** पाहिलंस नांव काढतांच सैतानासारखा हजर झाला.

**बापू :** सैतान होऊन कुणाच्या मानगुटीवर बसण्यासाठीं मी आलों नाहीं. यशवंत आजारी असल्याचं समजलं म्हणून त्याला पहाण्यासाठीं आलों आहें.

**काका :** पहाण्यासाठीं आलास कीं साक्षीदार म्हणून हजर झाला आहेस ?

**बापू :** साक्षीदार—

**काका :** हा यशवंत बापाच्या इष्टेटीचा हिस्सा-हिशेब मागतोय. तूं त्याच्या बापाचा मित्र आहेस. ठरलेल्या कटाप्रमाणं वेळेवर हजर झाला असशील.

**बापू :** माझ्या उभ्या आयुष्यांत मी कसलेच कट केलेले नाहींत. माझ्या संसाराशिवाय कुणाच्या व्यवहारांत कधीं ढवळाढवळ केलेली नाहीं.

**काका :** हा एवढा तडफडाटानं कां बोलतोय तें मला सारं कांहीं ठाऊक आहे. या भरल्या घरांतून याला बाहेर काढून, अर्ध्या इस्टेटीचा वारसदार म्हणून माझ्या समोर उभा करण्याचं तुझं कारस्थान आहे.

**यशवंत :** बापूवर असला घाणेरडा आरोप करण्याचं कारण नाहीं.

**काका :** अरे, या सगळ्या भांडणाच्या मुळाशीं हाच आहे.

**बापू :** भरल्या घराची फाटाफूट करणारा मी नाहीं, पण या पोरांना कशा ना कशा कारणानं घराबाहेर काढण्याचं तुझंच कारस्थान आज कैक दिवस चाललंय !

**काका :** त्याला तर हांकलून देणारच, पण तूं आधीं इथून चालता हो पाहूं ! पुन्हा माझ्या घराची पायरी चढूं नकोस !

**बापू :** माझा तसा निश्चय आहे. या पोरक्या पोरांसाठींच मानापमान गिळून आजपर्यंत इथं येत होतों. पण या पुढं—

**यशवंत :** यावं लागणारच नाहीं बापू !

**बापू :** म्हणजे ?

**यशवंत :** आजच्या आज हें घर सोडणार आहे मी.

**बापू** : अशा आजारी स्थितींत ?

**काका** : रस्त्याच्या कडेला जाऊन मरायचं असेल.

**यशवंत** : रक्ताची नातीं विसरणाऱ्या या माणुसकीच्या मसणवटींत मरण्यापेक्षां कुठल्या तरी झाडाखालीं रस्त्याच्या कडेला मरणं फार बरं !

**बापू** : यशवंत—

**काका** : तो मरणाच्या दारापर्यंत पोहोंचलाय्, तूं त्याच्या तिरडीची तयारी करून ठेव जा.

**बापू** : निर्दय माणसा, पोटच्या पोरासारखा भावाचा एकुलता एक पोरगा, त्याच्यासंबंधानं असले शब्द उच्चारतांना, तुला शरम वाटायला हवी. यशवंता, पोरा ! आज पर्यंत तुला कधीं वाईट सल्ला मी दिलेला नाहीं, पण या क्षणीं तुला अगदीं निर्वाणीचं सांगतों, कुठंही जाऊन मोलमजुरी करून पोट भर ! पण या घरांत यापुढं अन्न घेऊं नकोस ! ईश्वर तुम्हांला कुठंही सुखी ठेवील. जातों मी.

**यशवंत** : बापू !

**बापू** : आणि माझ्याकडं यावसं वाटलं तर हा बापू तुला मायेनं हृदयाशीं धरायला दारांतच उभा आहे. [ बापू एकदम निघून जातो. इतक्यांत उमा आंतून शांताला घेऊन येते आणि यशवंतच्या अंगावर ढकलते ]

**उमा** : आणि मीही तुला तेंच सांगतें आहे. या पोरीला घेऊन या क्षणाला घराबाहेर पड.

**यशवंत** : वहिनी !

**उमा** : होय. तुझी वहिनी तुला सांगते आहे. आजपर्यंत तुमच्यामुळं–तुमच्या मायेमुळंच मी या घरांत जगूं शकलें. पण तो आधार मी होऊनच नाहींसा करतें आहें !

**शंकर** : उमा !—

**उमा** : मला उमा म्हणून हांक मारायला लाज वाटली पाहिजे तुम्हांला. ज्या वेळीं तुम्हीं माझ्या पावित्र्याविषयीं शंका घेतलींत त्याच वेळीं तुमच्याबद्दलचा आदर पार नाहींसा झाला.

**काका** : उमा शुद्धींत आहेस ना तूं ?

**उमा** : आजपर्यंत शुद्धींत नव्हतें. पण आज सारं कांहीं समजून चुकलं आहे मला. पैशापुढं पाठच्या भावाची–पोटच्या पोरांची ज्यांना किंमत नाहीं, त्यांना बायकोच्या–सुनेच्या भावनांची कितीशी जाणीव असणार ?

**काका** : इतका फाजीलपणा ?

**उमा** : सासरे या नात्यानं तुमची सारी हुकुमत पाळली आहे मी आजपर्यंत ! यांच्याकडं जायचं नाहीं–त्यांच्याशीं बोलायचं नाहीं–धनधान्याची उधळपट्टी कराची नाहीं–सगळ्या बाबतींत तुमची करडी नजर ! मी तुमच्या मुलाचा संसार सजवायला आलें होतें–उजाड करायला नाहीं. तुमच्या घराची भाग्यलक्ष्मी म्हणून मी या घरांत आलें होतें. पण तुम्हीं पैसे खर्चून घेतलेल्या गुलामासारखी वागवलींत मला. ज्या दिवशीं तुम्हीं या पोरांना घरांत कोणतंही स्वातंत्र्य द्यायचं नाहीं म्हणून बजावलंत त्या दिवसापासून मी अधिक सहानुभूतीनं त्यांच्याजवळ वागूं लागलें, आणि हें तुमच्या लक्षांत आल्याबरोबर माझ्या खऱ्या छळाला सुरुवात झाली.

**शंकर** : उमा !

**उमा** : केव्हां तरी हें सांगण्याची संधी मला हवीच होती.

**शंकर** : आतां तोंड आटोप नाहींतर गळादाबून जीव घेईन तुझा.

**उमा** : पतिचं कर्तव्य झुगारलंत तेव्हांच माझा प्राण घेण्याचा अधिकार गमावलांत ! माझ्या पावित्र्याचे रक्षणकर्ते म्हणून जर तुम्हीं माझ्या पाठीशीं असतां तर प्राण घेण्यासाठीं मोठ्या आनंदानं माझा देह तुमच्या हवालीं केला असता. जगण्यासाठीं शेवटचा श्वासही घेतला नसता !

**शंकर** : उमा—

**उमा** : ज्याला पाठचा भाऊ–पोटचा पोर म्हणून मायेनं वागवलं, त्या यशवंत-भाऊंबद्दल, ज्या वेळीं नीचतेचा आरोप तुम्हीं माझ्यावर केलांत, त्याचवेळीं तुमची उमा मेली. खलास झाली. तिचं भूत आतां तुमच्यासमोर उभं आहे. यशवंतभाऊ, शांता या ‘ घराबाहेर ’ पडा. वहिनीची काळजी करूं नका !

**शांता** : ( मिठी मारते ) वहिनी !

**उमा** : शांता, यशवंतभाऊ, कुठंही जा ! आनंदानं रहा. वहिनीला विसरून जा

आणि कांहीं वाटेल तें झालं तरी यशवंतभाऊ, शांताला मोतीरामभाऊंनाच द्या. जा तुम्हीं–माझा आशीर्वाद तुमच्या पाठीशीं आहे !

**यशवंत** : वहिनी !

**उमा** : मागं माझं काय होईल, याची काळजी करूं नका ! मलाहि वाटतंय या क्षणालाही बाहेर पडावं. पण यानीं माझ्याविषयीं संशय घेतला म्हणून त्यांच्या संशयाला पुष्टी देण्यासाठीं मी भ्याडासारखी काय म्हणून घराबाहेर पडणार ? यांना जरी घराण्याच्या इभ्रतीची किंमत वाटत नसली, तरी मी त्या इभ्रतीला तडे जाऊं देणार नाहीं–घरची अब्रू चव्हाट्यावर मांडणार नाहीं. माझं मागं काय होईल याची काळजी तुम्हीं करूं नका ! मी देवाब्राह्मणांच्या साक्षीनं या घरांत आलें आहे. मला घराबाहेर काढण्याचा अधिकार कुणालाच नाहीं आणि बाहेर पडायचंच झालं. तर जिवंतपणीं नाहीं. वहिनीचं प्रेतच या घराबाहेर जाईल.

[ निघून आंत जाते ]

**यशवंत** : ( गहिंवरून ) मातृप्रेमाचा–शेवटचा आधारही नाहींसा झाला. जातांना बापू म्हणाले–माझ्या घरीं या म्हणून, पण मला त्यांच्याही घरीं जायचं नाहीं. रक्ताची नातीं जीव घ्यायला तयार होतात ! काका, बाबांनीं मरतांना आम्हांला तुमच्या स्वाधीन केलं आणि 'यांना कधींही अंतर देऊं नको' असं तुम्हांला सांगितलं होतं ! पण आज तुम्हीं आम्हांला घराबाहेर काढतां आहांत ! ठीक ! ! मी–मघाशीं जें कांहीं बोललों असेन, विसरून जा तें. तुम्हीं हीं पोरकीं पोरं लहानाचीं मोठीं केलींत हें आम्हीं केव्हांही विसरणार नाहीं. तसंच तुमच्यासमोर हिस्सेदार म्हणून यशवंता कधींही उभा राहणार नाहीं. मी माझ्या कर्तबगारीवर कुठंही नांवलौकिकाला चढेन ! पण काका, आपल्या रक्तमांसाची–आपल्या भावाचीं दोन 'पोरकीं पोरं' पृथ्वीच्या पाठीवर कुठं तरी आहेत एवढं मात्र विसरूं नका !

[ यशवंत–शांता जातात–काकांच्या तोंडांतून 'पोरकीं पोरं' असे अस्पष्ट शब्द पडतात. ]

**स मा प्त**